


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








वर्ष ३२ । अंक १ । हिवाळा २०१४

# भाषा आणि जीवन

"महाराज, मी मारामारी केली. पण मारामारी करायची म्हणून मारामारी केली नाही. मी स्वच्छ आहे. रोज आंघोळ करतो. मी इतर माणसांसारखा माणूस आहे. हॉटेलात इतर पैसे देऊन चहा घेतात तसाच मी घेणार होतो, तरी मला कुत्र्यासारखे हाकलले हे मला सहन झाले नाही; बेकारीने मी कावून गेलो होतो. म्हणून मी हात उचलला. केवळ एका जातीत जन्माला आलो, एवढ्यासाठी मला माणूस म्हणून जगणे कठीण का असावे, हे मला कळत नाही. मला याहून काही सांगावयाचे नाही."

-'बळी'; विभावरी शिरूरकर





मराठी अभ्यास परिषद पत्रिका

संपादक : नीलिमा गुंडी
संपादकीय-सल्लागार : अशोक रा० केळकर, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले
संपादन-समिती : नीलिमा गुंडी (प्रमुख), प्र०ना० परांजपे, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनन्द काटीकर
संपादकीय पत्रव्यवहार : नीलिमा गुंडी, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002. संपर्क : (020) 2448 6015 ई-पत्ता : nmgundi@gmail.com
प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता : आनन्द काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. चलभाष : 094216 10704
मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष : (020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक :
चित्तरंजन भट - 095459 50808 विजय पाध्ये - 098220 31963.
marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) वार्षिक वर्गणी

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| व्यक्ती : | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| संस्था : | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/- + नोंदणी शुल्क ₹ १००/-**. आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरात दर :** पूर्ण पान ₹ २,५००/-, अर्धे पान ₹ १,५००/-, पाव पान ₹ ८००/-, शुभेच्छा ₹ ४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹ ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

प्रकाशन : त्रैमासिक; जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी).
सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

## देणगी : १

पुणे

दिनांक : २० डिसें. २०१३

मा० अध्यक्ष

मराठी अभ्यास परिषद, पुणे

महोदय,

मराठी ही ज्ञानभाषा व्हावी याविषयीच्या आस्थेने गेली तीन दशके सातत्याने विविधांगांनी गुणवत्तापूर्ण कार्य करणाऱ्या संस्थांमध्ये 'मराठी अभ्यास परिषद' ही संस्था अग्रगण्य आहे.

मराठी ही ज्ञानभाषा म्हणून अधिक सकस, समृद्ध व सौष्ठवपूर्ण कशी होईल याचा ध्यास घेऊन गेली कित्येक वर्षे तळमळीने कार्यरत असलेल्या श्रीमती सत्त्वशीला सामंत यांचे संस्थेशी तिच्या स्थापनेपासूनच निकटचे संबंध होते. 'भाषा आणि जीवन'साठी लेखन करणे, परिषदेच्या अनेक उपक्रमांत व चर्चासत्रांत सहभागी होऊन यथाशक्ती योगदान करणे हे त्या सातत्याने करीत होत्या. 'अभ्यास परिषदे'शी असलेल्या या त्यांच्या स्नेहाचे प्रतीक म्हणून सत्त्वशीला सामंत यांच्या स्मरणार्थ 'मराठी अभ्यास परिषदे'साठी देणगीदाखल सोबत एक धनादेश पाठवीत आहे. कृपया स्वीकार व्हावा.

धनादेशाचा तपशील :

धनादेश क्र० २४३६६४/दि० २०-१२-२०१३<br>
स्टेट बँक ऑफ इंडिया, एरंडवणे शाखा, पुणे ४११ ००४.<br>
धनादेशाची रक्कम ₹ १,५०,००० (₹ एक लाख पन्नास हजार)

मन:पूर्वक शुभेच्छांसह, धन्यवाद.

सस्नेह,<br>
(विठ्ठल दामोदर सामंत)

---

## देणगी : २

सुधा गोवारीकर (पुणे) यांनी मराठी अभ्यास परिषदेला ₹ १०,००० ची देणगी दिली आहे.

परिषद वरील दोन्ही देणगीदारांविषयी कृतज्ञ आहे.

---



अनुक्रमणिका

संपादकीय

# भाषाप्रकाश

नीलिमा गुंडी

बृहदारण्यकोपनिषदात जनकाने याज्ञवल्क्य ह्याला विचारले होते : 'सूर्य अस्ताला गेल्यावर, अग्नी विझल्यावर माणसाजवळ कोणता प्रकाश असतो?'

तेव्हा जनकाने उत्तर दिले होते : 'भाषा हा आपला प्रकाश असतो. कारण काळोखात काम करताना आपल्याला आपले हात दिसत नाहीत; पण आपण ऐकू शकतो आणि त्या दिशेने जाऊ शकतो.

हे वाचताना लक्षात येते की, भाषेच्या अंगची प्रकाशमानता हा तिचा महत्त्वाचा गुणधर्म आहे. केवळ व्यावहारिक पातळीवरच नव्हे; तर रूपकाच्या पातळीवरूनही भाषेतील प्रकाशतत्त्व समजून घ्यायला हवे. भाषेद्वारेच आपल्याला जगाची जाणीव होत असते. पायाखालच्या लहानशा गवताच्या पात्यापासून डोक्यावरच्या विराट अवकाशापर्यंतच्या अवघ्या वस्तुमात्राची ओळख तिच्यामुळेच होते. इतकेच नव्हे; तर दृष्टीसही न पडणाऱ्या तसेच अमूर्त असणाऱ्या अनेक घटकांचे संवेदन आपल्यापर्यंत पोचवण्याचे काम करून भाषा आपले भावजीवन उजळून टाकत असते. ती आपल्याला जन्मभर सोबत करताना आपल्या आंतरिक विश्वातील केवळ जाणिवांचाच नव्हे; तर अर्धजाणिवांचा कप्पाही व्यापून टाकत असते. आपल्या जाणिवांमध्ये शब्दांशी निगडित स्मृतिप्रतिमा सतत लुकलुकत असतात. अर्धजाणिवांबाबत सांगायचे तर अगदी लहानपणी आईने गायलेली अंगाईगीते, बडबडगीते - ज्यांचा अर्थही मुलाला कळलेला नसतो - मुलाच्या स्मृतिमंजुषेत कायमची ठसा उमटून राहतात.

व्यक्तीपलीकडे जाऊन विचार करता असे लक्षात येते की, समाजाच्या सामूहिक नेणिवेचा मोठाच प्रांत भाषेने घडवलेल्या प्रतिमांमुळे संपन्न झालेला असतो. एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे जाणाऱ्या सांस्कृतिक संचितासाठी भाषेचे प्रकाशकिरण दिशा दाखवत असतात. उदाहरणार्थ, 'चांदोमामा' ही आपली भाषिक प्रतिमा चंद्राला भावनिक झळाळी बहाल करणारी आहे आणि ही प्रतिमा आपल्याकडील अनेक पिढ्यांच्या मनात घर करून आहे.

भाषेतील प्रकाश व्यक्तीला एकाकीपणाच्या निबीड अंधारातही सोबत करीत असतो. स्वत:शी संवाद साधायला माध्यम उपलब्ध करून देत असतो. शिवाय तो प्रकाश व्यक्तीला स्थलकालनिरपेक्ष अशा विशाल भाषिक परंपरेशी जोडून देत असतो. आपण एका मोठ्या





अनुक्रमणिका

समाजाशी बांधलेले आहोत, या जाणिवेनेच आपल्या मनाला मोठी उभारी येत असते.

हे सगळे खास करून आठवायचे कारण म्हणजे सध्या चालू असलेले सामाजिक स्थित्यंतर आणि त्यातून निर्माण झालेले भाषाविषयक अस्वस्थतेचे वातावरण, हे होय. एकविसावे शतक हे स्थित्यंतराचे शतक आहे. हे स्थित्यंतर आर्थिक, राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक असे अनेक पदरी आहे. स्थित्यंतर म्हणजे बदल. 'बदल' हा शब्द उच्चारताच आपणांस सर्वसाधारणपणे धास्ती वाटते. वास्तविक बदल ही एकच गोष्ट खरे तर सतत घडणारी असते तरीही! या संदर्भात ऑल्व्हिन टॉफ्लर यांचे 'फ्यूचर शॉक' हे पुस्तक आठवते. त्या पुस्तकात लेखकाने पृथ्वीवरील भावी जीवनाचे कल्पनाचित्र रेखाटले आहे. त्यातील संभाव्य बदलांसाठी समाज जर मनाने तयार राहिला नाही, तर समाजमनाला मोठाच धक्का बसेल, असा गर्भित इशाराच त्या पुस्तकाच्या शीर्षकातून दिलेला आहे.

आज जागतिकीकरणाचा रेटा सर्वच क्षेत्रांमध्ये बदल घडवीत आहे. प्रचंड वेगाने बदलणारे तंत्रज्ञान भौतिक विश्वात बदल घडवीत आहे. संपर्क माध्यमांचे स्वरूप बदलले आहे. त्यामुळे व्यक्तीच्या मनोविश्वावर तसेच कौटुंबिक-सामाजिक नातेसंबंधांवरही कळत-नकळत परिणाम होत आहे. बाजारीकरणामुळे जाहिरातींचे वाढते आक्रमण व्यक्तीच्या संवेदना बधिर करीत आहे. एकंदरीत सर्वसाधारण व्यक्तीला हादरवून टाकणारी अशी ही प्रक्रिया आहे. अशा वेळी वेगाने गरगरणाऱ्या या भोवतालच्या वातावरणात निदान पायाखालची जमीन तरी सुरक्षित - स्थिर - राहावी, अशा आशेने अनेकांचे लक्ष भाषेकडे केंद्रित होत आहे. समाज बदलतो, तेव्हा भाषाही बदलणार; पण निदान तिचे सत्त्व तरी जपले जावे, अशी अनेकांची धडपड आहे. याच भावनेतून अलीकडे काही लेखक विविध बोलींमधून लेखन करण्याकडे वळू लागलेले दिसतात. एकप्रकारे जागतिकीकरणामुळे होणाऱ्या सांस्कृतिक सपाटीकरणाविरुद्ध लेखकांनी उगारलेले ते प्रतिकारअस्त्रच आहे. भाषेच्या साहाय्याने आपली ओळख जपण्याचा आणि आपल्या समाजाचे आत्मतेज विझू न देण्याचा प्रयत्न त्यामागे आहे.

भाषेतील प्रकाशाचा अनुभव उपनिषदकारांनी जसा वर्णन केला आहे, तसाच संत ज्ञानेश्वरांनीही वर्णन केला आहे. ते लिहितात :

'जैसे बिंब तरी बचकें एवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें ।
शब्दाची व्याप्ती तेणें पाडें । अनुभवावी ॥'
('ज्ञानेश्वरी' संपा० शं०वा० दांडेकर : अध्याय ४, ओवी २१५)

या ओवीतील दृष्टांतातून ज्ञानेश्वरांनी भाषेतील प्रकाशतत्त्वाचे सूचनच केले आहे. तेव्हा सध्याच्या स्थित्यंतरातून जाताना भाषेच्या अंगचा अमीट प्रकाश आपल्याला दिशा देईल, असा दृढ विश्वास बाळगू या. ■

# भाषांतरप्रक्रिया : एक भाषाशास्त्रीय विवेचन

**अनघा भट**

गेल्या काही वर्षांपासून मराठी भाषेत भाषांतरित संहितांची फार मोठ्या प्रमाणावर आवक चालू आहे. ललित आणि ललितेतर (जसे वृत्तपत्रीय लेख, तांत्रिक माहिती, माहिती पुस्तके, जाहिराती, प्रशिक्षण सामग्री इ०) अशा विविध संहिता प्रामुख्याने इंग्रजी आणि हिंदी या दोन भाषांमधून मराठीत येताना दिसतात. या संहितांच्या भाषांतराचा अचूकपणा आणि मराठी वाचकावर ह्या संहिता घडवत असलेला परिणाम यांच्या मूल्यमापनाची एक किमान प्रणालीसुद्धा आजच्या घटकेला मराठी भाषिक व्यवहारात अस्तित्वात नाही.

अनुवाद म्हणावे की भाषांतर? भाषांतर : कला की शास्त्र? यांसारखे प्रश्न वारंवार चर्चिले जातात. परदेशी भाषांतकारांचे सिद्धांत उद्धृत केले जातात. भाषांतराचे प्रयोजन, त्याचे महत्त्व विशद करताना बाख्तिन, वॉल्टर बेन्यामिनसारख्या अनेक पाश्चात्त्य विद्वानांचा दाखला दिला जातो. भाषांतरप्रक्रियेविषयी बोलताना युजिन नायडाचा उल्लेख होतो. त्यात गैर काहीही नाही. परंतु हे पाश्चात्त्य तत्त्वचिंतक किंवा युजिन नायडासारखे प्रत्यक्ष भाषांतर-प्रक्रियेच्या तंत्रावर भर देणारे भाषांतरतंत्रकर्मी ठरावीक दोन भाषांमध्ये घडणारी एखादी ठोस भाषांतर-प्रक्रिया किंवा भाषांतरित संहिता डोळ्यांसमोर ठेवून बोलत असतात, सिद्धांतन करत असतात. त्याने मराठीतील भाषांतरव्यवहाराला कोणतीही पुष्टी मिळत नाही; कारण ह्या दोन्ही परदेशी भाषांमध्ये घडणाऱ्या भाषांतरव्यवहाराचा, ह्या दोन भाषांमधल्या तौलनिक भाषाशास्त्राचा अंदाज मराठी भाषांतरकाराला किंवा भाषांतराचे मूल्यमापन करणाऱ्याला प्रत्येक वेळी असतोच असे नाही. तुलनात्मक भाषाशास्त्राचे कोणते निकष लावून ही भाषांतरमीमांसा होते याचे प्रारूप मराठी आणि हिंदी अथवा मराठी आणि इंग्रजी अशा दोन भाषांना लावून तपासणे सहज शक्य आहे. पण तसेही होताना दिसत नाही. त्यामुळे मराठीतील भाषांतराची चिकित्सा ढोबळ मानाने संज्ञा (मग त्या तांत्रिक असोत, संस्कृतिविशिष्ट असोत किंवा 'अंकल' आणि 'काका' व 'मामा' ह्या प्रकारच्या दैनंदिन व्यवहारातल्या असोत) आणि त्यांचे अर्थ यांच्यापुरतीच सीमित राहते.

संज्ञांचा अर्थ ही भाषांतर-व्यवहारातील तुलनेने गौण बाब आहे. कोणत्याही संज्ञेचा अर्थ हा सदासर्वकाळ आणि सर्व प्रकारच्या वाक्यरचनांत एकसारखाच असत नाही. संज्ञांचा अर्थ नीटपणे पोचावा यासाठी भाषांतरकाराला वाक्यरचना आणि इतर व्याकरणिक बाबींचा विचार करावा लागतो. त्यासाठी भाषांतरकाराला लवचीक व प्रवाही धोरणव्यूह अंगिकारावा लागतो. काका आणि मामा ह्या दोन्ही संज्ञांचा निर्देश 'अंकल' ही एकच इंग्रजी संज्ञा

करत असली तरीही संपूर्ण स्रोतसंहिता साकल्याने वाचल्यानंतर 'काका' की 'मामा' यांपैकी कोणता पर्याय निवडायचा, हे भाषांतरकाराला अचूकपणे ठरवता येतेच.

मराठीत भाषांतर-समीक्षा म्हणून रूढ असणारा दुसरा प्रकार म्हणजे भाषांतरकारांचे अनुभवकथन. भाषांतरकाराने आपले भाषांतरप्रक्रियेबद्दलचे अनुभव इतरांसमोर मांडण्यात गैर काहीच नाही. त्यायोगे भाषांतरप्रक्रियेत येणाऱ्या अडचणी व त्याचे निराकरण करण्यासाठी वापरण्यात आलेले उपाय याची माहिती इतर भाषांतरकारांना होऊ शकते. परंतु भाषांतरतंत्र-कौशल्ये विकसित करण्यासाठी, भाषांतराची समीक्षा पुढे नेण्यासाठी किंवा सिद्धांतनाच्या दृष्टीनेही त्याचा फारसा उपयोग होऊ शकत नाही. याचे कारण असे, की भाषांतरकार स्वत: भाषांतराच्या प्रक्रियेत बुडालेला असल्या कारणाने तो पुरेशा तटस्थतेने प्रक्रियेचे चिकित्सक विश्लेषण करू शकत नाही. त्यामुळे अशा तऱ्हेचे अनुभवकथन पुष्कळदा 'if beautiful, not faithful; if faithful, not beautiful' यांसारखी वापरून वापरून गुळगुळीत झालेली वाक्ये आणि 'इश्श!' 'खरकटं', 'कुंकू', 'माहेर' यांसारख्या संस्कृतिसापेक्ष संज्ञांचे ('अशक्य' असणारे!) भाषांतर यांच्या चक्रात अडकलेले दिसते.

वास्तविक संस्कृतिविशिष्ट संज्ञांसाठी एक पर्याय निवडून त्याविषयी एकदाच तळटीप देणे पुरेसे असते. संस्कृतिविशिष्ट संज्ञेचे त्या त्या भाषक समाजाशी, संस्कृतीशी असणारे नाते वाचकाला संहितेच्या वाचनातूनच अधिकाधिक स्पष्ट होत जाते. त्याविषयी एक कुतूहल वाचकाच्या मनात निर्माण होते आणि भाषांतरित संहितेव्यतिरिक्त इतर माध्यमांतून ते कुतूहल शमवण्याचा वाचक प्रयत्न करू लागतो. मिळालेल्या नवीन माहितीच्या आधारे तो भाषांतरित संहितेचे पुनर्वाचन करतो, त्यामुळे भाषांतरित संहितेचे त्याचे आकलन अधिक समृद्ध, अधिक सखोल बनते.

भाषांतरमीमांसेत पुन्हा पुन्हा (अकारणच) उपस्थित केला जाणारा प्रश्न म्हणजे भाषांतर ही कला की भाषांतर हे शास्त्र? मानवाची प्रत्येक सर्जक कृती, मग ती शारीरिक असो वा बौद्धिक, जितक्या प्रमाणात कला किंवा शास्त्र असेल तितक्याच प्रमाणात भाषांतर कला आणि शास्त्रसुद्धा आहे. 'कला की शास्त्र' अशी मांडणी केल्यामुळे अशी समजूत होते की कला आणि शास्त्र ह्या दोन एकमेकींकडे पाठ फिरवून बसलेल्या 'म्युच्युअली एक्स्क्लुसिव्ह' बाबी असाव्यात. प्रत्येक कलेचेही एक तंत्र असते. कलेचा उच्च कोटीचा आविष्कार करायचा असेल तर तंत्र घोटावेच लागते. कोणत्याही शास्त्रीय शोधात अंत:प्रेरणेचा 'कलात्मक' भाग अंतर्भूत असतोच. त्यामुळे 'कला की शास्त्र' हा प्रश्न अप्रस्तुत आहे.

भाषा आधी जन्माला येते आणि मग तिचे व्याकरण घडते. तद्वतच भाषांतर आधी घडते आणि त्यानंतर भाषांतरमीमांसा रचावी लागते. भाषांतरमीमांसा करताना

भाषांतरव्यवहार नजरेआड करून चालत नाही. आणि भाषांतरव्यवहार तपासताना तुलनात्मक भाषाशास्त्र नजरेआड करून चालत नाही. मराठीतील सद्य:स्थितीतील भाषांतरव्यवहार डोळ्यांसमोर ठेवून भाषांतराविषयी भाषाशास्त्राच्या अंगाने एक विचार प्रस्तुत लेखात मांडला आहे.

'भाषांतर' ही संज्ञा दोन गोष्टींचा निर्देश करते. एक म्हणजे भाषांतरकार हाती घेत असलेली प्रक्रिया, तर दुसरी म्हणजे भाषांतरकाराने केलल्या कृतींचे फल. प्रक्रिया आणि तिचे फल ह्या दोन्ही गोष्टी एकमेकांशी अतूटपणे संलग्न आहेत. चुकीच्या प्रक्रियेचे फल देखील कमअस्सल असणार हे उघड आहे. परंतु असे असताही ह्या दोन्ही भिन्न आहेत असे मानून ह्या दोन्ही गोष्टींचे मूल्यमापन व्हावे लागते. याचे कारण म्हणजे प्रक्रियेनंतरची फलस्वरूपी संहिता वाचणारा वाचक भाषांतरकाराने केलेल्या प्रक्रियेविषयी अनभिज्ञ असतो, मूळ संहितेविषयीसुद्धा अनभिज्ञ असतो. भाषांतरप्रक्रियेमध्ये मूळ संहितेची किती हानी झाली, हे तो सांगू शकत नाही. भाषांतरित संहिता ही त्याच्या दृष्टीने नवी मूळ संहिता असते. जुन्या मूळ संहितेतील, अर्थात स्रोत संहितेतील अनेक गोष्टी तीतून निसटल्या असतील. तरीही वाचकाच्या दृष्टीने ती भाषांतरित संहिता त्याला काहीतरी नवीन अनुभूती देत असतेच. त्यामुळे वाक्यरचना जर मराठी वळणाची वाटत असेल तर 'भाषांतर आहे असं वाटतच नाही' म्हणून 'छान' असा अभिप्राय देऊन तो मोकळा होतो!

भाषांतरप्रक्रियेची छाननी जर तुलनात्मक भाषाशास्त्राचा आधार घेऊन केली तर भाषांतरप्रक्रियेत होणारी आशयाची गळती रोखता येऊ शकते. त्यामुळे भाषांतर अधिक दर्जेदार होते. प्रत्यक्ष दोन भाषा : स्रोत भाषा आणि लक्ष्य भाषा यांच्या व्याकरण व्यवस्था, चिन्ह व्यवस्था यांचा तुलनात्मक अभ्यास केल्यास तंत्रशुद्ध भाषांतरासाठी काही उपयुक्त कौशल्ये विकसित करता येऊ शकतात. सुदैवाने आज मराठीमध्ये अनेक भाषांतून भाषांतरे होतात. इंग्रजीतून होणारी भाषांतरे तर मुबलक प्रमाणात उपलब्ध आहेत. तेव्हा असा तुलनात्मक अभ्यास, निदान इंग्रजी व मराठी या जोडीपुरता का होईना, झाला तर भाषांतरकाराला त्याची भाषांतर तंत्रकौशल्ये वाढवता येतील, भाषांतरित संहितांचा दर्जा सुधारेल व पुढे सिद्धांतन करण्याच्या दृष्टीनेही त्याचा उपयोग होईल.

वास्तविक शब्दांचे अर्थ ही भाषांतरप्रक्रियेतील दुय्यम महत्त्वाची गोष्ट आहे. कोणत्याही शब्दाचा अर्थ वज्रलेप, अपरिवर्तनीय किंवा एकमेव कधीच नसतो. शब्दाचा अर्थ हा संदर्भ, व्याकरण आणि आजूबाजूच्या शब्दांचे अर्थ यांनुसार सतत बदलत असतो. भाषांतरात वाक्यरचनेला शब्दार्थाइतकेच किंबहुना त्याहूनही अधिक महत्त्व असते. भाषाशास्त्राच्या दृष्टीने पाहता भाषांतर हे एक विशिष्ट प्रकारचे संप्रेषण आहे, ज्यामध्ये संप्रेषण पूर्ण करण्यासाठी दोन भाषांमधल्या भाषाशास्त्रीय यंत्रणेची गरज भासते. मूळ संहिता ज्या भाषेमध्ये आहे त्या भाषेची व्याकरणिक वैशिष्ट्ये आणि ज्यामध्ये भाषांतर करायचे त्या

भाषेची व्याकरणिक वैशिष्ट्ये यांमधील साधर्म्ये व वैधर्म्ये यांची चर्चा करून भाषाशास्त्राच्या दृष्टीने त्यांचे समकक्ष पर्याय शोधणे असे या यंत्रणेचे स्वरूप असावे लागते. रशियन भाषांतरशास्त्र तौलनिक भाषाशास्त्राच्या पायावर आधारलेले आहे. एकंदरच भाषांतरकार पार पाडत असलेली प्रक्रिया भाषाशास्त्राच्या पायावर उभी असावी, भाषाशास्त्राचे दोन भाषांमधल्या ह्या विशिष्ट प्रकारच्या संप्रेषणाचे निरीक्षण करावे, विश्लेषण करावे याबद्दल रशियन भाषाशास्त्र अत्यंत आग्रही आहे. (उदा० कमिस्सारव, 'भाषांतराचे भाषाशास्त्र')

बायबलच्या विविध भाषांतरांच्या विश्लेषणाच्या आधारे भाषांतराच्या तंत्रावर प्रकाश टाकणाऱ्या युजिन नायडा यांनीसुद्धा संहितेच्या व्याकरणिक विश्लेषणाला प्राधान्य दिलेले आढळते. इतकेच नव्हे तर शब्दांचा अर्थ निश्चित करण्यात व्याकरण कोणती भूमिका बजावते याची सविस्तर मांडणी नायडांनी केलेली दिसते. कमिस्सारव आणि नायडा यांनी अनुक्रमे मांडलेला व्याकरणिक व्यवस्थांच्या तुलनेचा आणि अर्थनिश्चितीसाठी व्याकरणाच्या भूमिकेचा केलेला विचार केंद्रस्थानी ठेवून मराठीत झालेल्या काही भाषांतरांचा विश्लेषक आढावा प्रस्तुत लेखात घेतला आहे. तसेच विश्लेषणासाठी घेतलेली भाषांतरे इंग्रजीतून मराठीत झालेली भाषांतरे आहेत. त्यामुळे स्रोतभाषा इंग्रजी व भाषांतराची भाषा मराठी असेल तर तुलनात्मक भाषाशास्त्राच्या आधारे भाषांतरात कशा प्रकारच्या त्रुटी दिसून येतात व अर्थाची कोणत्या प्रकारची हानी होते, हे तपासले आहे. तपासण्यात आलेली सर्व उदाहरणे प्रातिनिधिक आहेत. मुद्दा स्पष्ट करण्यासाठी विस्तारभयास्तव एकदोन उदाहरणेच दिली आहेत; अशी अनेक प्रकारची उदाहरणे भाषांतरित संहितांतून वरचेवर सापडतात. तुलनात्मक भाषाशास्त्राच्या आधारे त्या त्रुटींवर मात करण्याचे उपायही सुचवले आहेत.

स्रोत भाषा आणि लक्ष्य भाषा यांची व्याकरणिक वैशिष्ट्ये तपासली तर असे आढळते की, काही वैशिष्ट्ये दोन्ही भाषांमध्ये आहेत (जसे इंग्रजी व मराठीतील वचन, लिंग व विभक्ती) काही वैशिष्ट्ये फक्त स्रोत भाषेत आहेत (जसे इंग्रजीतील 'definite' व 'indefinite articles' तर काही वैशिष्ट्ये फक्त लक्ष्य भाषेत आहेत. (जसे मराठीतील क्रियापदांची क्रियाव्याप्ती). बरे, पुन्हा जी वैशिष्ट्ये दोन्ही भाषांमध्ये समान आहेत, त्यांचा आवाका निरनिराळा आहे.

इंग्रजीतील 'genitive case' आणि तिचे मराठीतील समकक्ष पर्याय यांची तुलना करून आपण हे सहजच पाहू शकतो.

| | |
|---|---|
| Marble collegiate church of New York city | न्यू यॉर्क सिटीमधील मार्बल कॉलेजिएट चर्च |
| Prince of Persia | पर्शियाचा राजकुमार |
| Quality of mercy | दया हा सद्‌गुण |

| | |
|---|---|
| Prisoners of war | युद्धकैदी |
| Note of ten pounds | दहा पाउंडांची नोट |
| A kilogram of tomatoes | एक किलो टोमॅटो |
| A cup of tea | कपभर चहा |

इंग्रजी व्याकरणव्यवस्थेत असणारी व मराठी व्याकरणव्यवस्थेत न आढळणारी दोन वैशिष्ट्ये आपण उदाहरणादाखल घेऊ : 'definite' व 'indefinite articles'; तसेच प्रधान वाक्य व उपवाक्यांची 'right branching' पद्धतीची रचना.

इंग्रजीत असणारी 'definite' व 'indefinite articles' वाक्यात महत्त्वाची भूमिका बजावत असतात. कोणताही स्वतंत्र अर्थ ती व्यक्त करत नाहीत, केवळ एक व्याकरणिक भूमिका ती बजावतात म्हणून त्यांच्या प्रयोजनाकडे केलेले दुर्लक्ष भाषांतरातील अर्थहानीला कारणीभूत होऊ शकते. उदा०

'And you have *a* detective who's a Finn'

Mrs Oliver admitted *the* fact. *A* small stolid boy not yet, Mrs Oliver would have thought, arrived at *the* seniority of the eleven-plus, said sternly, 'Why *a* Finn?' (Hallowe'en Party : Agatha Christie)

*'तुमचा डिटेक्टिव्ह फिन आहे ना?' 'हो' 'का? फिन का?' (भाषांतर मधुकर तोरडमल)*

मूळ उताऱ्यामध्ये अधोरेखित केलेली articles ज्या शब्दांच्या अगोदर येतात, त्यांच्याविषयी ती काही अधिक माहिती देतात. जसे 'ए डिटेक्टिव्ह' म्हणजे मिसेस ऑलिव्हरच्या लेखणीतून उतरलेल्या अनेक सत्यान्वेषींपैकी एकजण. ए फिन (उपपदांचे फिन)सुद्धा फिनलंडच्या रहिवाशांपैकी एक हा अर्थ सूचित करतो. आर्टिकल्सचे भाषांतर न झाल्याने Finnचा अर्थ मराठी वाचकाला उलगडत नाही. मूळ संहितेत त्यानंतर येणारा भाग भाषांतरात गाळला असल्याने ते अतिशय तुटक वाटते. पुढच्या वाक्यातील अधोरेखित केलेले आर्टिकल 'द' भाषांतरित होणे गरजेचे आहे. नमुना भाषांतर असे असू शकेल :

*'आणि तुमचा एक डिटेक्टिव्ह फिनलंडचा आहे.' ही गोष्ट खरी आहे असे मिसेस ऑलिव्हरने कबूल केले. बथ्थड चेहऱ्याच्या एका लहान मुलाने (मिसेस ऑलिव्हरना वाटलं की अकरा पूर्ण ही वयाची अट त्याने अद्याप पूर्ण केली नसणार) जरा घुश्श्यातच विचारलं, 'का? फिनलंडचाच का म्हणून?'*

इंग्रजीतील 'आर्टिकल्स'साठी वर अधोरेखित केलेले शब्द पर्याय म्हणून वापरले आहेत. लक्षात घेण्याची गोष्ट ही की या पर्यायांनासुद्धा स्वतःचे असे स्वतंत्र अर्थ नाहीत. ज्या शब्दांना ते जोडून येतात त्यांविषयी ते अधिक माहिती देतात. 'एक' किंवा 'हा' व

त्यांची रूपे वापरताना लक्षात ठेवण्याची बाब अशी की ती नामाला जोडून आली पाहिजेत. त्या दृष्टीने A small stolid boy हा वाक्यांश पाहावा. त्याचे भाषांतर 'एका बथ्थड चेहऱ्याच्या लहान मुलाने' असे न होता. 'बथ्थड चेहऱ्याच्या एका लहान मुलाने' असे होईल.

इंग्रजीतील वाक्यरचना मराठीपेक्षा अधिक गुंतागुंतीची असते. उपवाक्ये नक्की कोणत्या वाक्यांशाशी संलग्न आहेत ती गुंतागुंत सोडवण्याचा प्रयत्न न करता, त्यांच्यातील कार्यकारणभाव अथवा कालानुक्रम यांच्याकडे दुर्लक्ष केल्यास व केवळ शब्दप्राधान्य मानून भाषांतर केल्यास फारच गमतीशीर परिस्थिती उद्‌भवू शकते. नमुन्यादाखल खालील तीन उदाहरणे पहा :

(अ) The elf-road through the wood which the dwarves had followed on the advice of Beorn now came to a doubtful and little used end at the eastern edge of the forest. (The Hobbit : J.R.R. Tolkien)

*बिऑर्नच्या सल्ल्यावरून ड्वार्फ्सनी स्वीकारलेल्या जंगलातील बनवलेल्या रस्त्याचा शेवटसुद्धा संशयास्पद व फारच थोड्या वापराचा झाला होता. (भाषांतर मीना किणीकर)*

स्रोत भाषेतले वाक्य आपण आता कार्यकारणभाव व कालानुक्रम यांना प्राधान्य देऊन पुन्हा मांडून घेऊ. ते वाक्य आता असे दिसेल : Beorn advised dwarves. The dwarves followed elf-road on his advice. The road ran through the forest. It went to the eastern edge of the forest. It ended doubtfully. It was little used.

भाषांतरित वाक्यामध्ये हा कार्यकारणभाव अथवा कालानुक्रम स्पष्ट होत नाही. याचे कारण असे की शब्दप्राधान्य मानून व केवळ शब्दांच्या सुट्या सुट्या अर्थावर लक्ष केंद्रित करून, संदर्भ लक्षात न घेता भाषांतर झाले आहे, जसे 'रस्त्याचा शेवटसुद्धा संशयास्पद'!. सोडवून घेतलेले वाक्य डोळ्यापुढे ठेवून भाषांतर केल्यास ते असे दिसेल :

*ड्वार्फ्सनी बिऑर्नच्या सांगण्यावरून घेतलेला जंगलातून जाणारा एल्फ रस्तासुद्धा जंगलाच्या पूर्व सीमेला येईपर्यंत बेभरवशी बनला होता आणि फारसा वापरात नसल्यासारखा दिसत होता.*

(आ) जिथे जिथे 'जर तर' अशी परस्परावलंबी वाक्ये असतात, तिथे तिथे कालानुक्रम व परस्परावलंबित्व कशा प्रकारचे आहे, याची नीट मांडणी झालीच पाहिजे. अन्यथा मूळ अर्थाच्या बरोबर उलटा अर्थ भाषांतरातून निघलेला दिसतो. उदा०

She was pleased it was term time again. She never knew quite what to do with herself in the holidays. She had two married sisters with whom she stayed in turn, but they were

naturally more interested in their own doings and families than in Meadowbank. Miss Johnson, though dutifully fond of her sisters, was really only interested in Meadowbank. (Cat amongst Pigeons : Agatha Christie)

*सुटी संपून शाळा परत सुरू झाल्याच्या आनंदात ती होती. सुटीचे दिवस तिला फार कंटाळवाणे वाटत. काय करावं, कसा वेळ घालवावा हे तिला समजत नसे. तिच्या दोन विवाहित बहिणी होत्या. आळीपाळीने ती त्यांच्याकडे राहत असे. तिला शाळेशिवाय बोलायला दुसरा विषय नसे आणि त्यांना शाळेत काहीच रस नसे. त्या आपल्या संसारात गर्क असत. पण तिचं बहिणींवर प्रेम होतं. म्हणून शाळा सुरू झाल्याचा तिला आनंद वाटत होता. (भाषांतर - मधुकर तोरडमल)*

मूळ संहितेतील अधोरेखित केलेले वाक्य व त्याचे अधोरेखित केलेले भाषांतर दोन बरोबर विरुद्ध गोष्टी सुचवतात. शेवटच्या वाक्याकडे घेऊन येणारा परिच्छेद भाषांतरात सयुक्तिक न ठरता वाचणाऱ्याचा गोंधळ मात्र उडवून देतो. तसेच वरील भाषांतर गोषवारा पद्धतीने केले असल्याने स्रोत संहितेतील मुद्द्यांचा भाषांतरात उल्लेख होतो; परंतु ते जशा क्रमाने व ज्या तऱ्हेच्या अवलंबित्वाने यावयास हवेत तसे येत नाहीत. स्रोत संहितेचे नमुना भाषांतर असे देता येईल :

*शाळा पुन्हा सुरू झाली याचं तिला बरं वाटत होतं. सुट्टीत काय करावं ते तिला कधीच कळत नसे. तिच्या दोन विवाहित बहिणी होत्या. ती त्यांच्याकडे आलटून पालटून राहत असे. पण त्यांना अर्थातच त्यांच्या संसारात आणि कुटुंबात मीडोबँकपेक्षा जास्त रस होता. आणि मिस् जॉनसनचं बहिणींवर प्रेम जरी असलं तरी तिला खराखुरा रस फक्त मीडोबँकमध्येच होता.*

(इ) इंग्रजीमध्ये पुष्कळदा प्रधान वाक्य सुरुवातीला येते व त्याला पुढे अनेक गौण उपवाक्ये चिकटतात. मराठीत भाषांतर करताना असे भले मोठे वाक्य तोडावे लागते. ते तोडताना जर गफलत झाली तरी अर्थाचा अनर्थ होऊ शकतो. इंग्रजीमध्ये क्रियापदांपासून बनवलेली नामे सर्रास वापरली जातात. ती नामे सोडवून, ती दर्शवत असलेले वाक्य मांडून घ्यावे लागते. उदा०

As the anthropologist Joseph Alter has shown, there has been a strong and somewhat bizarre convergence among modern yoga. German naturopathy and Indian nationalism in the construction of an ideal of masculinity that demonstrates its strength through self restraint, self denial and a continence that serves as a reservoir for super human energy. (Crafting of Reality : Sudhir Patwardhan, Ranjit Hoskote)

*मानववंशशास्त्र जोसेफ ऑल्टर याने असं दाखवलं आहे की, आधुनिक योगशास्त्र, जर्मन निसर्गोपचार आणि भारतीय राष्ट्रवाद याचं काही विचित्र असं एकीकरण झालं आहे. त्यातून आदर्श पुरुषत्वाची कल्पना निर्माण झाली आहे. आत्मसंयम, स्वसुखत्याग आणि इंद्रियनिग्रह यांतून ईश्वरी शक्तीचा संचय होतो असं मानलं गेलं आहे. असा हा आदर्श वीर पुरुष अजिंक्य मानला जातो. (भाषांतर - दिलीप रानडे)*

स्रोत संहितेमधील convergence आणि construction ही क्रियापदांपासून बनलेली दोन नामे महत्त्वाची आहेत. Convergence ह्या शब्दाची जर आपण फोड केली तर x, y,--etc. converge असे एक वाक्यच आपल्या हाती लागते. तीच बाब construction ह्या शब्दाची. X constructs y. असे वाक्य आपणाला मिळते. Convergenceची उकल न करता केवळ त्याचा 'एकीकरण' हा शब्दकोशातील अर्थ वापरल्याने 'आधुनिक योगशास्त्र, जर्मन निसर्गोपचार आणि भारतीय राष्ट्रवाद याचं काही विचित्र असं एकीकरण झालं आहे.' असे गल्लत करणारे वाक्य आले आहे. As the anthropologist Joseph Alter has shown, ह्या प्रधान वाक्याने सुरुवात झाल्यामुळेही भाषांतरात एका वाक्याची दोन, तीन वाक्ये करावी लागली आहेत. मराठीच्या धाटणीला अनुसरून प्रधान वाक्य शेवटी घेऊन तसेच क्रियापदापासून बनलेल्या नामांची फोड करून स्रोत वाक्याचे पुढीलप्रमाणे भाषांतर होऊ शकते :

*आत्मसंयम, सुखत्याग आणि अतिमानवी ऊर्जेचा जणू साठाच असा इंद्रियनिग्रह यांद्वारे आपली शक्ती दाखवून देणाऱ्या आदर्श पुरुषत्वाची रचना करण्यामध्ये आधुनिक योगशास्त्र, जर्मन निसर्गोपचार आणि भारतीय राष्ट्रवाद यांच्यात फार मोठी आणि चमत्कारिक वाटेल अशी एकवाक्यता आढळून येते; असे जोसेफ ऑल्टर या मानववंशशास्त्रज्ञाने दाखवून दिले आहे.*

इंग्रजीतील दीर्घ पल्ल्याची, अनेक उपवाक्यांनी बनलेली संयुक्त वाक्ये मराठीच्या सरावाची नाहीत, ही बाब तर खरीच. त्यामुळे अनेकदा भाषांतरकाराला सुलभीकरणाचा, लहान लहान वाक्ये बनवण्याचा मोह टाळता येत नाही. विशेषत: असे लहान लहान वाक्यात केलेले भाषांतर जास्त 'वाचनीय' वाटू शकते. ('भाषांतर केलंय असं वाटतच नाही' ही प्रशस्ती खरे तर भाषांतरकारांनी धोक्याची घंटाच समजायला हवी!) परंतु असे करताना केवळ शब्दार्थांच्या पलीकडे असणारा संहितेचा एक समग्र विचारव्यूह तर उद्ध्वस्त होत नाही ना, याची काळजी भाषांतरकाराने घेतली पाहिजे.

उदा० Patwardhan explores the body private as well as the body politic : if human figure in his paintings is a participant in dramas of solidarity, antagonism and disruption, the individual in his drawings is often a house claimed by diverse impulses. (Crafting of Reality : Sudhir Patwardhan, Ranjit Hoskote)





अनुक्रमणिका

*पटवर्धन लोकांच्या खासगी आणि सामाजिक जीवनाचा एकाच वेळी वेध घेतात. त्यांच्या चित्रात मानव कधी संघटित तर कधी विघटित अशा स्थितींमध्ये आढळतो. काही वेळा हे परस्परविरोधी आवेग एकाच मानवाकृतीत एकत्रित झालेलेही दिसतात. (भाषांतर - दिलीप रानडे)*

स्रोत संहिता बॉडी पॉलिटिक आणि बॉडी प्रायव्हेटबद्दल बोलते. तसेच पेंटिंग आणि ड्रॉइंग ह्यांमध्ये भिन्नत्व दाखवते. मानवाकृती आणि व्यक्ती यांच्या चित्रणातल्या फरकाबद्दलही बोलते. शिवाय त्याबद्दलचे भाष्य हे 'जर तर' अशा प्रकारचे अवलंबित्व दाखवते. कोणत्याही तऱ्हेचे शास्त्रीय विवेचन पारिभाषिक संज्ञाच्या आधारे केले जाते. पेंटिंग आणि ड्रॉइंग हे दोन्ही शब्द एखाद्या सामान्य संहितेत एकमेकांचे पर्याय म्हणून किंवा समानार्थी शब्द म्हणून वापरले जाऊ शकतात परंतु चित्रकलेबद्दल शास्त्रीय विवेचन करणाऱ्या संहितेत दोन्हीचे 'चित्र' अस ढोबळ भाषांतर योग्य नाही. नमुना भाषांतरचा एक पर्याय पुढे देत आहे, परंतु चित्रकलातज्ज्ञांकडून आणखी एखादा बरा पर्याय सुचवला जाऊ शकेल.

*पटवर्धन एकाच वेळी दोन प्रकारच्या देहांचा धांडोळा घेतात; एक व्यक्तीचा आणि एक समूहाचा. जर त्यांच्या रंगचित्रांतली मानवाकृती ऐक्य, विरोध आणि खंडितता यांच्या नाट्यात सहभागी होत असेल, तर त्यांच्या रेखाटनांतली व्यक्ती ही अनेकवार परस्परविरोधी प्रेरणांचे आश्रयस्थान बनलेली दिसते.*

अशा प्रकारची अनेक उदाहरणे देता येणे शक्य आहे. कारण भाषांतरकार शब्दार्थावर जितके लक्ष केंद्रित करताना दिसतात तितके लक्ष ते वाक्यरचनेकडे पुरवत नाहीत. त्यामुळे भाषांतरित संहिता वाचताना (जरी काही वेळेला ती बऱ्यापैकी 'वाचनीय' असली तरी) अनेकदा ती तर्कविसंगत अथवा विस्कळीत वाटते.

भाषांतर विस्कळीत वाटण्याचे अजून एक निराळे कारण आहे. त्याचा उल्लेख इथे करणे आवश्यक वाटते. कोणत्याही भाषिक कृतीला एका सांकेतिक सामाजिक संदर्भातच अर्थ प्राप्त होत असतो. हे सांकेतिक सामाजिक संदर्भ प्रत्यक्ष भाषिक कृतीमध्ये अनुक्त असतात, ते शब्दांतून व्यक्त केले जातातच असे नाही. परंतु भाषिक कृती करणाऱ्याच्या आणि ती कृती ऐकणाऱ्या किंवा वाचणाऱ्याच्या मनात ते अगदी स्पष्ट असतात. भाषांतर करताना हे अनुक्त सांकेतिक संदर्भ स्पष्ट करणे, त्यांचा उच्चार करणे हे भाषांतरकाराचे कर्तव्य ठरते. मुळात ते संदर्भ भाषांतरकाराला स्पष्ट झालेले असावे लागतात. पुढील उदाहरणाने मुद्दा स्पष्ट होईल.

Mrs Hargreaves, the organist's wife, came into the room breathing heavily, and bearing a large green plastic pail.

'What about this,' she said 'for the apple bobbing? Kind of gay, I thought'

Miss Lee, the doctor's dispenser, said, 'Galvanized bucket's better. Won't tip over so easily. Where are you going to have it, Mrs Drake?'

'I thought the bobbing for apples had better been in the library. The carpet's old there and a lot of water always gets split, anyway' (Hallowe'en Party : Agatha Christie)

*'मिसेस हारग्रेव्हज' ऑर्गन वाजवणाऱ्याच्या बायकोनं मध्येच विचारलं, 'या सफरचंदांचं काय?'*

*डॉक्टरांची कंपाउंडर असणाऱ्या मिस लीनं म्हटलं, 'टोपली यापेक्षा मोठी हवी. म्हणजे सफरचंद खाली घरंगळणार नाहीत. ही सफरचंद कोठे ठेवायची मिसेस ड्रेक?'*

*'अभ्यासिकेत ठेवलेली बरी. सफरचंद झेलताना ती खाली पडून फुटतात. पाणी उडतं. अभ्यासिकेतला गालिचा जुना आहे. पाणी पडलं तरी काही बिघडणार नाही.'*

*(भाषांतर - मधुकर तोरडमल)*

वर उल्लेख केलेल्या स्रोतसंहितेतला संदर्भ आहे तो 'ॲपल बॉबिंग' किंवा 'बॉबिंग फॉर ॲपल्स' या खेळाचा. खेळाचे नाव जरी संहितेत आले असले तरी प्रत्यक्ष तो खेळ कसा असतो याबद्दल संहिता मुग्धता बाळगते. कारण भाषिक कृती करणारा आणि संहिता वाचणारा ह्या दोघांनाही खेळाविषयी संपूर्ण माहिती आहे, हे गृहीत आहे. त्यामुळे संहितेतील अधोरेखित केलेले शब्द कशाचा निर्देश करतात याविषयी कोणतीच संदिग्धता वाचकाच्या मनात नाही. पण भाषांतरात मात्र ह्या अनुक्त संदर्भांची जाण नसल्याने भलत्याच गोष्टींकडे निर्देश झाला आहे. आपण अगोदर नमुना भाषांतर पाहू व नंतर अनुक्त संदर्भ स्पष्ट करण्याच्या महत्त्वाची चर्चा करू.

*चर्चमध्ये ऑर्गन वाजवणाऱ्याची पत्नी, मिसेस हारग्रीव्हज, एक भली मोठी हिरवी प्लॅस्टिकची बादली घेऊन हाश्शहुश्श् करत खोलीत आली. 'बॉबिंग फॉर ॲपल्सच्या* खेळासाठी ही कशी आहे? जरा रंग मुलांना आवडेल असा आहे, माझ्या मते,' ती म्हणाली.*

*डॉक्टरांकडे कंपाउंडर असणारी मिस ली म्हणाली, 'पत्र्याचं गॅल्व्हनाइज्ड् बकेट बरं पडतं यापेक्षा. ते चट्कन उलटत नाही. खेळ कुठे घ्यायचेत मिसेस ड्रेक?'*

*'मला वाटतं बॉबिंग फॉर ॲपल्स अभ्यासिकेत घेतलेलं बरं. तिथला गालिचा जुना आहे. तसंही या खेळात पाण्याची खूप सांडलवंड होते.'*

[*तळटीप : बॉबिंग फॉर ॲपल्स* किंवा 'सफरचंदासाठी मारा डुबकी' : हॅलोवीनच्या सणाच्या दिवशी खेळण्यात येणारा खेळ. यामध्ये एका मोठ्या बादलीत पाणी भरतात व त्यात सफरचंदे टाकतात. खेळाडूंचे हात पाठीमागे बांधतात. खेळाडूंनी हातांचा वापर न करता बादलीत वाकून पाण्यात तरंगणारे सफरचंद दातांनी उचलायचे असते.*]

हा संदर्भ लक्षात घेऊन जर भाषांतर केले तर ते अर्थातच सुसंगत वाटते. लहान मुलांसाठी हा खेळ आहे हा संदर्भ लक्षात आला की Kind of gay, I thought या वाक्याची संगती लागते. तसेच कशाप्रकारचा खेळ आहे हे समजले की पत्र्याचे बकेट का हवे, तेही समजते. हे सर्व संदर्भ वाचकापर्यंत पोचावेत यासाठी तळटीप देण्याची गरज आहेच. वर सुचवलेले नमुना भाषांतर आणि स्रोत संहिता यांतील अधोरेखित शब्द या दृष्टीने ताडून पाहावेत. नमुना भाषांतरात भाषांतरकाराने स्वैर भाषांतर केले आहे, असे म्हणता येणार नाही. फक्त जे अनुक्त आहे त्याचा स्पष्ट उच्चार केला आहे. भाषांतरकाराने पदरचे काही घालू नये हे खरे; परंतु कुठल्याही तऱ्हेची संदिग्धता भाषांतरात असता कामा नये; ह्या नियमाचे कसोशीने पालन मात्र व्हावे. प्रस्तुत संहितेच्या बाबतीत तर हा अनुक्त संदर्भ स्पष्ट करण्याला अनन्यसाधारण महत्त्व आहे. कारण मूळ संहिता आहे एक रहस्यकथा. ह्या रहस्यकथेत घडणारा पहिला खून एका पौगंडावस्थेतील मुलीचा आणि तोही पाण्याने भरलेल्या बादलीत डोके दाबण्याने होतो!

भाषांतराची चर्चा खूपदा केवळ शब्दार्थांच्या चौकटीत अडकलेली राहते. पुष्कळदा समोर ठोस उदाहरणे नसल्याने तिचे औचित्य समजत नाही. वाक्यविचार, व्याकरण यांचा आधार घेऊन भाषांतरातील त्रुटी दाखवण्याचा हा प्रयत्न आहे. प्रत्यक्ष भाषांतराकारांना याचा उपयोग व्हावा, हा हेतू यापाठीमागे आहे. वाक्यविचाराला प्राधान्य देण्याचा उद्देश भाषांतकारांच्या मनातही रुजला तर भाषांतरातील अर्थाची, आशयाची गळती होण्याचे प्रमाण कमी होईल.

■

**संदर्भ :**


१. कमिस्सारव वे०एन०,लिंग्विस्तिका पिरिवोदा (भाषांतराचे भाषाशास्त्र) मॉस्को, १९८०.

२. नायडा युजिन आणि टेबर चार्ल्स, द थिअरी अँड प्रॅक्टिस ऑव्ह ट्रान्सलेशन, लायडन १९७४.

भाषांतराची उदाहरणे खालील पुस्तकांवरून घेतली आहेत.

१. 'कॅट अमंगस्ट पिजन्स,' भाषांतर मधुकर तोरडमल, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००९

२. 'दि हॉबिट्स', भाषांतर मीना किणीकर, डायमंड प्रकाशन, पुणे, २०११

३. 'रेखाचित्रविचार,' भाषांतर दिलीप रानडे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, २०१२

४. 'हॅलोवीन पार्टी,' भाषांतर मधुकर तोरडमल, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००९.

# हैदराबादेतील महाविद्यालयीन शिक्षण व मराठी भाषा

उषा जोशी

[ऐतिहासिक पार्श्वभूमी : उस्मानिया विद्यापीठाचा मराठी विभाग शताब्दीच्या दिशेने वाटचाल करीत आहे. त्यानिमित्ताने मागे वळून पाहावेसे वाटते.]

हैदराबाद राज्य हे विस्ताराने व लोकसंख्येने भारतातील अन्य संस्थानांपेक्षा मोठे असले तरी त्याची रचना होण्यास व त्याला स्थैर्य येण्यास बराच काळ जावा लागला. येथे आधुनिक शिक्षणाची सोय व गरज एकोणिसावे शतक संपत असताना निर्माण झाली. भारतातील अन्य प्रांत मग ते ब्रिटिश मुलुखातील असोत वा अन्य संस्थानांतील असोत, प्रगती करीत असताना हैदराबादला मागे राहणे परवडणारे नाही, याची जाणीव येथील राज्यकर्त्यांना व जनतेला व्हायला लागली होती. ती तीव्र होऊन स्थापनेची घटिका जवळ येण्यास १९१८ साल उजाडावे लागले. त्यापूर्वी हैदराबादेतील शिक्षणाचे सूत्र मद्रास विद्यापीठाशी संलग्न घ्यावे, असाही विचार त्या वेळी पुढे आला. बरीच भवति न भवति होऊन सर अकबर हैदरी यांनी हैदराबादसाठी स्वतंत्र विद्यापीठ स्थापन व्हावे असा ठराव १९१७ साली मांडला. तो मान्य होऊन बादशहाने फर्मान काढले, ते २१ सप्टेंबर १९१८ला. त्यानुसार विद्यापीठाची स्थापना करण्यात आली; त्यासाठी उर्दू माध्यमाचा पुरस्कार करण्यात आला. तयारीचा भाग एवढा की, भाषांतराच्या विभागाची स्थापना सरकारने त्यापूर्वी एक वर्ष आधी ६ सप्टेंबर १९१७ रोजी केलेली होती व त्यासाठी एप्रिल १९१७च्या फर्मानाचा आधार देण्यात आला होता. ते फर्मान उस्मान अलीखांच्या राज्यारोहणाच्या संदर्भात निघाले होते व विद्यापीठाची स्थापना हे त्याचे फलित होते. प्रत्येक फर्मानात उर्दू भाषेचा पुरस्कार करण्यात आलेला होता.

**विद्यापीठाची मुहूर्तमेढ :** हैदराबाद राज्यातील तत्कालीन परिस्थितीत शिक्षणखाते स्वतंत्रपणे कार्य करीत असले, तरी विद्यापीठाच्या स्थापनेनंतर मॅट्रिकच्या परीक्षा, इंटरच्या परीक्षा घेण्याचा व तदनंतरच्या प्रक्रियेचा भाग विद्यापीठावर सोपविण्यात आला. पुढेही ही व्यवस्था दीर्घकाळ चालू ठेवण्यात आली. केवळ विद्यापीठाय शिक्षण देणे, एवढेच कार्य विद्यापीठाने केले नाही तर जिल्ह्याजिल्ह्यातून शाळांचे दीर्घकाळ नियंत्रणही केले. विद्यापीठाच्या वार्षिक अहवालात मान्यताप्राप्त शाळांची सूची व मॅट्रिक पास झालेल्या विद्यार्थ्यांची यादी देण्याची प्रथा होती. १९४०नंतर त्यात बदल झाला. विद्यापीठीय व्यवस्थेत इंग्रजी हा आवश्यक विषय म्हणून ठेवण्यात आला. राज्यातील अन्य प्रादेशिक

भाषांच्या बाबतीत त्या काळची सरकारी परिपत्रके व अहवाल मुग्ध आहेत. परंतु जोपर्यंत विद्यापीठीय प्रश्न होता तोपर्यंत ह्या विषयांना प्रवेश देण्याबाबत खळखळ झालेली दिसत नाही. मराठीबरोबर कन्नड, तेलुगु या विषयांचा प्रवेश अभ्यासक्रमात झाला व त्याची कागदोपत्री नोंद उपलब्ध आहे.

विद्यापीठांतर्गत युनिव्हर्सिटी कॉलेजचे उद्घाटन ऑगस्ट १९१९मध्ये करण्यात आले. त्यानुसार पहिली इंटरची परीक्षा एप्रिल १९२१मध्ये झाली. पहिली बी०ए०ची परीक्षा १९२३मध्ये झाली. या मधल्या काळात प्रो० चिं०नी० जोशी यांची मराठी विषयासाठी तात्पुरती नेमणूक करण्यात आली. मराठी विषय घेऊन परीक्षा देणाऱ्यांची संख्या १९२० साली पहिल्या वर्षात दहा व दुसऱ्या वर्षात सहा असल्याची नोंद आढळते. (त्यांची नावे मात्र मिळू शकली नाहीत. विद्यापीठाचे अहवाल आणि अन्य अधिकृत पत्रके नावे देत नाहीत. ती अन्यत्र शोधावी लागतात; पण ती सलग आढळत नाहीत.)

**मराठी विभागाची स्थापना :** विद्यापीठाची स्थापना करताना आपणांस काहीतरी वेगळे व चांगले करण्याची इच्छा आहे, ही भावना सार्वत्रिक होती. अभ्यासक्रमाची आखणी, विषयांची निवड, प्राध्यापकांची निवड अशा अनेक बाबतीत अन्य विद्यापीठांचे अनुकरण करावयाचे नाही, हे सूत्र त्यात होते. त्याचबरोबर इस्लामी संस्कृतीचा ठसा एकूण व्यवस्थेवर राहील, राहावा याची काळजी घेतलेली होतीच. पण जोपर्यंत सरकारी यंत्रणेचा प्रश्न होता, त्यात विविध विषयांसाठी जी अभ्यासमंडळे नेमली जात त्यात प्रत्येक विषयाच्या समितीवर सरकारी आज्ञेनुसार एक खास माणूस नेमण्याची दक्षता घेण्यात येई. त्याला त्या भाषेचे कामचलाऊ ज्ञान असावे, हे तर गृहीत होतेच. १९१९-२०च्या मराठी अभ्यासमंडळाच्या संदर्भात अन्य नावांच्या बरोबर मौलवी मोहंमद याकूबखां यांची नेमणूक झाल्याची नोंद आढळते. त्यांनी कुराणाचे मराठी भाषांतर केले होते. त्यांच्या नेमणुकीच्या संदर्भात विद्यापीठाच्या आदेशाची शब्दरचना अशी होती-

''Most of the Text-books in Marathi presented for various examinations of the University had not received the sanction of the Govt. as they were not passed by religious courses committee. Hence, a representation was being made to H.E.H. He was pleased to order that Mohmedan Muslim conversant in the language should be appointed to express opinion on the books from a religious and Islamic point of view. Accordingly the Text-Books Committees were reconstituted and marginally noted gentlemen were entrusted with the job.''

विद्यापीठाच्या या आदेशाच्या बाजूला मौलवीच्या नावाची मराठीसाठी नोंद आहे. हे गृहस्थ काही वर्षे अभ्यासमंडळावर होते, व नंतरही इतर कुणी ना कुणी मराठी

अभ्यासमंडळावर असा सदस्य असायचाच. एकूण सर्वच सदस्य हे नेहमीच नियुक्त झालेले असत. प्रो० चिं०नी० जोशी यांच्या व्यतिरिक्त प्रो० वेलिंगकर हे इंग्रजी विषयाचे अध्यापक गृहस्थ असत. प्रो० चिं०नी० जोशी यांची प्रथम चार वर्षांसाठी तात्पुरती नेमणूक, नंतर दोन वर्षांची मुदतवाढ, नंतर काही काळानंतर पुन्हा त्यांची नियुक्ती यावरून विद्यापीठाच्या धोरणाचे सूत्र प्रगट झाले ते एवढेच की मराठी विषयाचे, भाषेचे अस्तित्व जरूर राखले जाईल; पण वेगवेगळ्या तांत्रिक व अन्य बंधनांचा भाग त्यात राहीलच. त्या मर्यादेतच पुढे मराठी विभागाच्या वाटचालीस आरंभ झाला. त्या मर्यादेत करता येईल तेवढे काम विभागाने केले.

**विद्यापीठाचे ध्येयधोरण**

(अ) स्वातंत्र्यपूर्व काळ : करता येईल तेवढे यासाठी म्हणावयाचे की, उर्दू भाषेच्या अधिसत्तेचा काही एक भाग वगळला तर उस्मानिया विद्यापीठाने मराठीच्या कामाला उत्तेजनच दिले. इतर प्रादेशिक भाषांना जी सवलत मिळत गेली तिचा लाभ मराठीला मिळाला. विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती, अभ्यासमंडळाची स्थापना, विद्यार्थीसंघाची स्थापना, हस्तलिखिते गोळा करण्यासाठी प्रेरणा व आज्ञा एवढेच नाही तर खर्चाची तरतूद, अध्यापकांना उच्च पदवी मिळविण्यासाठी अन्य विद्यापीठात पाठविणे, मराठीच्या प्राध्यापकांना निरनिराळ्या संमेलनास जाण्यास परवानगी व खर्च देणे, बाहेरचे प्रतिष्ठित साहित्यिक हैदराबादेत आल्यास त्यांचा लाभ विद्यार्थ्यांना मिळवून देणे, १९३७-३८ला एम०ए०चे वर्ग उघडणे इ० गोष्टी विद्यापीठाच्या पुढाकाराने तरी झाल्या किंवा अभ्यासमंडळाच्या सूचनांचा स्वीकार करण्यामुळे तरी झाल्या. विशेषत: संशोधनाच्या बाबतीत विद्यापीठ आरंभापासून दक्ष होते. जे वेगवेगळे अहवाल उपलब्ध आहेत, त्यांचे क्रमाने वाचन केल्यास त्या बाबतीत स्वतंत्र निर्देश स्पष्टपणे आढळतो. कोणत्या कोणत्या प्राध्यापकांनी वर्षभरात काय अभ्यास केला, लेखन केले, संशोधन केले, प्रकाशन केले याची कटाक्षाने नोंद घेतलेली आढळते. त्याच्यासाठी वेळोवेळी खर्च केलेला आढळतो. उस्मानिया विद्यापीठाने १९२०-१९४६ या काळात अखिल भारतीय स्वरूपाच्या दोन परिषदा भरविल्या. त्यात मराठीच्या प्राध्यापकांना सहभाग दिला. स्टडी सर्कल तर होतेच. केवळ संशोधनासाठी म्हणून वेगळी शिष्यवृत्ती ठेवून एकदोन वेळा माणसे नेमल्याची नोंद देखील आहे. पंचवीस वर्षातील विद्यापीठाच्या या धोरणाची नोंद घेणे म्हणूनच क्रमप्राप्त ठरते.

(ब) स्वातंत्र्योत्तर काळ : स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तर या धोरणात चांगल्या गोष्टींच्या बाबतीत फरक पडण्याचा संभव नव्हताच. त्यांचा विस्तार झाला. दुर्दैवाने हा काळ जेमतेम पाचसहा वर्षांचा ठरला. राजकीय व अन्य स्थित्यंतरे वेगाने येत गेली. १९५०ला उस्मानिया

विद्यापीठाची नवी घटना आली. पुनर्रचना झाली. त्यानुसार बदल झाले. मराठीला असलेल्या जागांचे उन्नयन झाले. नव्या जागा निर्माण झाल्या. प्रथम प्रश्न अशा वेळी विस्ताराचा येतो व तो संख्यात्मक असतो. तसा तो मराठीच्या बाबतीतही आला. त्यातून काही वेगळे अर्थपूर्ण रूप सिद्ध होण्याच्या बाबतीत काळाने कुणालाच सवड दिली नाही. १९५६नंतर पुन्हा स्थिरस्थावर होण्यास अवधी जावा लागला. संख्यात्मक विस्ताराचा प्रश्नच संपला मग उरला तो गुणात्मक फरक. हा काळातील बदल विद्यापीठाने खळखळ न करता मान्य केला व विभागाने त्यातील मर्म ओळखले. मुख्य मुद्दा हा की विद्यापीठीय धोरण मराठीच्या कार्याला व अभ्यासाला आरंभापासून पोषकच राहिले. त्यात काही त्रुटी आढळल्या तर त्या आपल्या समजाव्यात. अन्यथा एखाद्या विषयाबद्दल विभागाबद्दल सतत उदार धोरण ठेवल्याचे अन्यत्रही असे उदाहरण आढळणार नाही. त्याची अधिक खोलात जाऊन कारणमीमांसा करणे अनावश्यकच ठरावे. मराठी विभागाने त्याबद्दल विद्यापीठाशी कृतज्ञच राहिले पाहिजे.

**मराठी अभ्यासमंडळाची नियुक्ती :** मराठी अभ्यासमंडळाचा ओझरता निर्देश वर आला आहेच. त्या बाबतीत आज गमतशीर वाटणारी गोष्ट म्हणजे मराठी अध्यापनाशी साक्षात संबंध नसलेली; पण मराठी विषयाशी या ना त्या नात्याने सार्वजनिक जीवनात निगडित असलेल्या व्यक्तींची अभ्यासमंडळावरील नियुक्ती. १९१९-२०च्या सुमारास प्रो० वेलिंगकरांच्या नियुक्तीचा उल्लेख झाला आहेच. हे गृहस्थ नामांकित प्राध्यापक, पण शहरात मराठी संतांवर व्याख्याने देत. सभासंमेलनांत भाग घेत. त्यांना आरंभापासून बराच काळ मराठी अभ्यासमंडळावर स्थान मिळालेले दिसते. किंबहुना १९२४मध्ये प्रो० चिं०नी० जोशी यांच्या अभ्यासमंडळाचे सूत्रचालन केले असले पाहिजे. नक्की सांगता येत नाही. १९२४-२७ या काळात अभ्यासमंडळावर खालील व्यक्तींची नियुक्ती झाली होती.

(१) प्रो० एन०जी० वेलिंगकर, (२) प्रो० अबदुल हक्, (३) श्री० एच०बी० अत्रे, (४) पंडित केशवराव (कोरटकर), (५) हकीम मौलवी मीर मोहंमद याकूबखां.

या वेळी प्रो० चिं०नी० जोशी एक वर्ष येथे नव्हते. पंडित केशवराव कोरटकर यांची नियुक्ती मात्र अनेक दृष्टींनी बोलकी आहे. प्रत्यक्षात त्यांनी किती हातभार लावला ते सांगता येणार नाही. पण प्रो० जोशी यांची मैत्री व मराठी विषयासंबंधी आस्था, त्यामुळे त्यांचे नाव मराठी विषयाला प्रतिष्ठा देणारे ठरले. पंडित केशवराव कोरटकर केवळ मराठी अभ्यासक नव्हते, तर संशोधकही होते, हे मराठी अभ्यासकांना माहीत आहेच. १९२०-३०च्या सुमारास या अभ्यासमंडळाचा विस्तार झाला व तो चांगल्या अर्थाने झाला. प्रो० चिं०नी० एव्हाना परत आलेले होते. त्या वेळी अभ्यासमंडळही मोठे झाले. त्यात पुढील व्यक्तींचा समावेश होता-

(१) प्रो० चिं०नी० जोशी, (२) श्री० एच०बी० अत्रे, (३) श्री० पंडित केशवराव, (४) श्री० आर०ए० क्षीरसागर, (५) श्री० व्ही०के० भोगले, (६) श्री० वि०कृ० भावे, (७) श्री० विठ्ठलराव, (८) श्री० रावसाहेब जोशी (र० मु० जोशी)

ह्या मंडळात रावसाहेब जोश्यांचा समावेश होणे ही गोष्ट मराठीच्या दृष्टीने शुभसूचक होती. त्याचप्रमाणे 'विवेक वर्धिनी'तील वाङ्मयप्रिय अध्यापक व पुढे मुख्याध्यापक झालेले वि०कृ० भावे हेही त्यात होते. एक गोष्ट तर्काने ओळखता येते की, मराठी विषयाचा १९३२-३४नंतर जो झपाट्याने विकास झाला, त्याचे मर्म कुठेतरी या मंडळाच्या घटनेत असावे. १९३१ला हैदराबादेत महाराष्ट्र साहित्य संमेलन डॉ० श्री०व्यं० केतकर यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते; व त्याचे चिटणीस रावसाहेब जोशीच होते. या संमेलनात निझाम प्रांतातील हस्तलिखिते गोळा करणे व मराठीचे संशोधन करणे याबाबत एक नव्हे; तर अनेक ठराव आहेत. ते संदर्भ, अभ्यासमंडळाची रचना व १९३२नंतर मराठी विभागाने मराठी संशोधनाच्या दृष्टीने उचललेली अनेक पावले यांचा एकत्रित विचार केला तर १९२९ ते १९३२ ही वर्षे मराठी विभागाच्या दृष्टीने निर्णायक ठरली, असे म्हणावे लागते. प्रो० चिं०नी० जोशी यांची एव्हाना स्थिर नेमणूक झालेली होती. तत्संबंधाचे वाद निकालात निघाले होते. दहा वर्षांच्या कार्यकालानंतर विद्यापीठात विषय स्थिरावला होता व कार्यकर्त्यांना नवनव्या योजनांची स्वप्ने पडत होती.

**मराठी संशोधनाचे श्वास-निःश्वास :** १९३२-३४ या काळात अभ्यासमंडळावर श्री० शेंदरकरांची नवी नियुक्ती झाली. कोरटकर वारले होते. या काळात विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मिळायला आरंभ झाला होता. एवढेच नव्हे तर 'संशोधक साहाय्यक'ही महिना ₹ ७५ची शिष्यवृत्ती निर्माण झाली होती. १९३५-३८ या काळात विभागाने अनेक आघाड्यांवर घोडदौड केली. याच काळात प्रो० जोशी लेक्चरर होते. ते रीडर झाले व पुढे ३७-३८ या काळात निवृत्त झाले. त्यांच्या जागी प्रा० र०म० भुसारी यांची नियुक्ती झाली. जोशी निवृत्त झाले तरी त्यांच्या सेवेचा लाभ मिळावा म्हणून त्यांना पुन्हा अर्धवेळ प्राध्यापक म्हणून नियुक्त करण्यात आले. याच काळात विद्यार्थीसंघाच्या कार्यामुळे वातावरणात चैतन्य आले. त्याचा तपशील नंतर येईलच. एकूण मराठी अभ्यासमंडळ म्हणजे मराठीची गंगोत्री ठरली. पुढे संशोधक म्हणून ख्यातनाम झालेले इतिहास-संशोधक श्री० र०मु० जोशी हेही अभ्यासमंडळाशी काही काळ निगडित होते.

१९३७-३८ याच काळात डॉ० ना०गो० नांदापूरकर मराठी विभागात औरंगाबादहून येऊन दाखल झाले. एम०ए०चे वर्ग निघाले होतेच. पण ते निघाले अभ्यासमंडळाच्या ठरावामुळे. विद्यापीठाच्या अहवालात तशी नोंद आहे. तो तांत्रिक उपचार किती व प्रेरणा किती याचे फक्त अनुमान करावयाचे.

संशोधनाचा व्याप वाढत असताना एम०ए०ला आरंभ होणे, भुसारींचे व

नांदापूरकरांचे विभागात स्थिर होणे, या घटना याच दोनतीन वर्षांत मागेपुढे घडल्या. पहिल्या वर्षी मराठीला तीन विद्यार्थी बसल्याची अहवालात नोंद आहे. नावे दिलेली नाहीत. याच काळात तात्यासाहेब केळकर, श्री॰ना॰ बनहट्टी, प्रो॰ द॰वा॰ पोतदार, बाळूताई खरे, कवी गिरीश, ही मंडळी मराठी विभागात येऊन गेली, हे मुळी विद्यापीठाच्या अधिकृत अहवालातच नमूद केले आहे. याच काळात अभ्यासमंडळाला जोडून विद्यापीठाच्या आदेशानेच 'स्टडी सर्कल' स्थापन करण्यात आले. वेळोवेळी जोशी, र॰म॰ भुसारी, नांदापूरकर यांनी वाचलेल्या निबंधांची शीर्षके अहवालात आहेतच.

**केल्याने होत आहे रे ! :** १९४० ते ४६ या कालखंडात अभ्यासमंडळाला स्थिरता लाभलेली होती. याच काळात नांदापूरकरांना लेक्चरर म्हणून पदोन्नती मिळाल्याची नोंद आहे. १९४३-४४ या वर्षी बी॰ए॰ला १४ विद्यार्थी व एम॰ए॰ला दोन विद्यार्थी होते असेही म्हटले आहे. एका विद्यार्थ्याने पहिला वर्ग मिळविला व याच काळात विभागाने प्रथम हस्तलिखित मासिक काढले, याची अहवालात आवर्जून नोंद आहे. पहिला वर्ग मिळणे व मिळविणे ही गोष्ट विद्यापीठीय क्षेत्रात १९४७पर्यंत तरी खरोखरीच कसोटीची होती. अहवालांच्या शेवटी ज्या याद्या छापलेल्या आहेत, त्यांचे अवलोकन केल्यास हे स्पष्ट होते. तेथे विषयांची नोंद केलेली नसल्यामुळे अधिकृत कोण, केव्हा, कोणत्या वर्गात उत्तीर्ण झाले हे सांगणे कठीण आहे. अहवालात या काळात विद्यापीठात झालेली आंदोलने, चळवळी यांची विद्यापीठीय दृष्टीने केलेली नोंद आहे, हे जाता जाता नोंदवायचे; पण मराठी विभागाशी त्याचा तदृश संबंध नाही.

**स्वातंत्र्याचा अरुणोदय :** स्वातंत्र्य मिळाले. जुनी विटी बदलली, नवी घटना आली. तीनुसार अभ्यासमंडळाची पुनर्रचना झाली. हैदराबादबाहेरच्या तज्ज्ञ व्यक्तींना घेण्याची प्रथा आली. नव्या घटनेनुसार विद्यापीठाशी संलग्न महाविद्यालयातून सदस्य निवडण्याची प्रथा सुरू झाली.

विद्यापीठाची औरंगाबाद, गुलबर्गा व अन्य ठिकाणी स्वत:ची महाविद्यालये होती. तेथेही मराठी हा विषय होताच. १९५० नंतर विद्यापीठाने स्वत:ची महाविद्यालये वाढविली. ती जेथे स्थापन झाली तेथे शक्य असेल तेथे मराठीला स्थान मिळाले. याच काळात विद्यापीठाशी संलग्न म्हणून खासगी महाविद्यालये सुरू करण्यात आली. हैदराबादचे 'विवेक वर्धिनी', नांदेडचे 'पीपल्स कॉलेज', औरंगाबादचे 'मिलिंद महाविद्यालय' ही ठळक उदाहरणे. हा विस्तार नंतर वाढतच केला. मराठीच्या प्राध्यापकांची संख्याही वाढतच गेली. इंटरचे वर्ग विद्यापीठांतर्गत राहिल्यामुळे १९५०च्या पुनर्रचनेनंतर विद्यापीठात वेगवेगळी पदे निर्माण करण्यात आली. १९५२मध्ये नांदापूरकर प्रोफेसर झाले व १९५६च्या सप्टेंबरमध्ये निवृत्त झाले. प्रो॰ भुसारी सिकंदराबाद महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून नियुक्त झाले व तेथूनच १९५९च्या ऑगस्टमध्ये निवृत्त झाले. निझाम कॉलेजचे वेगळे अस्तित्व

होते. तेथे प्रथम श्री० क्षीरसागर प्राध्यापक होते. ते निवृत्त झाल्यावर १९३८मध्ये प्रा० रा०ब० माढेकर यांची तेथे नियुक्ती झाली. पुढे निझाम कॉलेज विद्यापीठाने ताब्यात घेतले व माढेकर विद्यापीठाच्या सेवेत आले. १९५२मध्ये 'रीडर', १९५६मध्ये विभागप्रमुख असलेले ते १८ एप्रिल १९६४ रोजी निवृत्त झाले.

**यशाची चढती कमान :** १९५०नंतर पुनर्रचना झाल्याचा निर्देश आलेला आहेच. परिणामी विभागाचा विस्तार झाला व त्याला बळ मिळाले. गुलबर्गा कॉलेजमध्ये अगदी आरंभकाळात धारवाडकर नावाचे गृहस्थ होते. १९५०मध्ये हैदराबाद शासनाने निवडीचे अधिकार विद्यापीठाच्याऐवजी आपणांकडे घेतल्यामुळे लोकसेवामंडळामार्फत १९५०नंतर अनेकांच्या नेमणुका झाल्या. प्रा० भगवंतराव देशमुख यांची प्रथम नियुक्ती झाली. त्यानंतर प्रा० भा०शं० कहाळेकर, प्रा० वि०पां० देऊळगावकर, डॉ० श्री०रं० कुळकर्णी, डॉ० ताराबाई केळकर, प्रा० मायाताई सरदेसाई यांचा यात समावेश करता येईल. विद्यापीठाची अनेक महाविद्यालये होती, चादरघाट, सिटी कॉलेज, निझाम कॉलेज, महिला महाविद्यालय, सैफाबाद इत्यादी हैदराबादेतील; तर गुलबर्गा, औरंगाबाद ही बाहेरची. मराठीच्या दृष्टीने हा वैभवाचा काळ म्हणावा लागेल. याच काळात गुलबर्गा येथे डॉ० चंद्रशेखर कपाळे यांची नियुक्ती झाली. विभागानेपण कधी नव्हे ते ताण, मरगळ झटकून मोकळेपणाने संचार सुरू केला. या कालखंडात १९५५मध्ये केलेली प्रा० विमलाताई थत्तेंची नियुक्ती ही शेवटची नियुक्ती होय. मराठी विभागाच्या दृष्टीने हा निश्चितच उल्लेखनीय काल म्हणावा लागेल. त्याला थोडी खीळ पडली ती १९५६च्या भाषावार प्रांतरचनेमुळे.

१९५७नंतर स्वाभाविकच सर्वांचा असा ग्रह झाला की मराठीचे भवितव्य संपले. विद्यापीठाचे धोरण व विद्यार्थ्यांच्या अल्पसंख्या यामुळे विभाग बंद पडतील. पण हे भविष्य खोटे ठरले. त्याला दोनतीन कारणे घडली. पहिली गोष्ट विद्यापीठातील उपकुलगुरूंचे सहानुभूतीचे किंबहुना उत्तेजनाचे धोरण. त्या काळातील आंध्र शासनातील मुख्यमंत्र्यांचे धोरण, व लोकजीवनातील नेते यांची मराठीविषयीची आस्था. जी परंपरा येथे दृढपणे चालली आहे, तिच्यात भाषाभिन्नत्वाचा सुरेख संगम घडला आहे. बदलत्या परिस्थितीत भले विद्यार्थ्यांची संख्या कमी होवो; पण संशोधन वा करण्याजोगी अन्य कामे अनेक आहेतच, याची डोळस जाणीव सरकार, विद्यापीठ व लोकजीवन यातील नेत्यांनी बाळगली. त्यातून विभागाला निश्चित बळ मिळाले; हे आज ५३ वर्षांनी अभिमानाने नमूद करावेसे वाटते. या काळात प्रो० भगवंतम्, प्रो० दोरायस्वामी, श्री० डी०एस० रेड्डी, डॉ० नरोत्तम रेड्डी, डॉ० रावडा सत्यनारायण, डॉ० जी० राम रेड्डी, न्या० जगमोहन रेड्डी, श्री० हाशीम अली, डॉ० नवनीतराव इ० यांतील अनेक मंडळी उपकुलगुरू होण्यापूर्वी येथील वातावरणात रमलेली व ध्येयनिष्ठ परंपरांचा परिचय असलेली होती. त्यामुळे विभागाला हात लावण्याचा

प्रश्न तर दूरच, पण मागाल ते मागाल तितके त्यांनी मराठीसाठी दिले व आजही देत आहेत. जी गोष्ट विद्यापीठीय अधिकाऱ्यांची, तीच शासनाची. तेथेही कुणी बदसूर काढला नाही. या सगळ्याला कारण जनतेची, कार्यकर्त्यांची व खुद्द विभागात काम करणाऱ्या व्यक्तींची पुण्याई होती.

**राज्य पुनर्रचनेनंतर :** १९५७ ते ५९ या काळात श्री० माणिकराव धनपलवार, श्रीमती उषा भोसेकर (जोशी), श्री० वसंतराव कुलकर्णी यांच्या नेमणुका विनासायास झाल्या. या नेमणुका होत असताना कालचक्राचा फेर काही थांबत नव्हताच. या कालखंडातील शोककारक घटना म्हणजे प्रा० भा०शं० कहाळेकरांचा सेवाकाळातच १९७५च्या मेमध्ये झालेला मृत्यू. अन्यथा इतर मंडळी यथावकाश निवृत्त झाली. निवृत्त होऊनही कार्यक्षम व मराठीच्या सेवेत रत राहिली. पुढे १९५९मध्ये नांदापूरकर गेले, १९८३ नोव्हेंबरमध्ये माडेकर वारले. १९८४मध्ये ताराबाई गेल्या व मे १९८६मध्ये भुसारी गेले. डॉ० श्री०रं० कुलकर्णी सप्टेंबर २००१मध्ये वारले. गेले ते आशीर्वाद देऊन व विभागाच्या मंगलत्वाची कामना करीतच.

निवृत्त होऊनही सेवाकाळापेक्षाही अधिक जोमाने मंडळी काम करीतच आहेत. अन्य विभागांत कदाचित हे दृश्य दिसणार नाही. १९७६मध्ये प्रा० मायाताई सरदेसाई निवृत्त झाल्या. १९८८मध्ये प्रा० विमलाबाई थत्ते व १९८९मध्ये डॉ० वसंतराव कुलकर्णी व डॉ० माणिकराव धनपलवार निवृत्त झाले. पुढे १९९२मध्ये डॉ० उषाबाई, २००४मध्ये डॉ० कटके निवृत्त झाल्या. सध्या डॉ० शोभा देशमुख या विभाग प्रमुख पदाची धुरा सांभाळीत आहेत. डॉ० गीता काटे ह्या याच वर्षी प्रोफेसर म्हणून नियुक्त झाल्या आहेत. सर्वांचे कार्य व मिळवलेले सन्मान हेच त्याला साक्ष आहेत. मग ते सेवेत असताना मिळाले काय किंवा नंतर मिळाले काय, ते सगळे मराठीच्याच खात्यावर जमा करण्यास हरकत नाही व त्या मराठीच्या खात्यावरील जमेला विद्यापीठाचा आधार हाही गृहीत आहेच.

**पीएच०डी० पदवीचे लेणे :** जो प्रश्न पीएच०डी० पदवी मिळविण्याचा आहे, तो एका मर्यादित अर्थाने वैयक्तिक सन्मानाचा व व्यापक अर्थाने विभागाच्या गुणवत्तेचा आहे. मराठी विभागात एम०ए०ची सोय झाली, याचा निर्देश येऊन गेलाच आहे. इतर विषयांत पीएच०डी०ची व्यवस्था झाली. पण मराठीला तो मान लवकर मिळाला नाही. (नागपूर युनिव्हर्सिटी १९५०), तर उस्मानिया विद्यापीठाच्या मराठी विभागातून येथेच प्रथम पीएच०डी० होण्याचा मान डॉ० श्री०रं० कुळकर्णी (१९५६) यांना मिळाला. त्यानंतर इथे अनेकजण पीएच०डी० झाले.

**मानसन्मानांचे तेजोवलय :** पीएच०डी०ची उपाधी हा मानाचा भाग खरा; पण शेवटी ती एक परीक्षा. हवं तर खडतर परीक्षा म्हणा! त्यात लोकांनी दिलेल्या सन्मानाचा संबंध येत नाही. पण विभागातील प्राध्यापकांनी हे सन्मान अगदी आरंभापासून मिळविले.

हे सन्मान सध्याच्या अनुकूल वातावरणात जेवढ्या संख्येने उपलब्ध आहेत तेवढे सन्मान पूर्वी परिस्थितीतच उपलब्ध नव्हते. हा कालगत फरकही लक्षात ठेवायला पाहिजे. जोपर्यंत गुणवत्ता ओळखण्याचा व सन्मानाचा प्रश्न आहे, तोर्यंत प्रो० चिं०नी० जोशी यांचा मराठी साहित्यक्षेत्रात बराच दबदबा होता. पण ते कधी कुठल्या सभासंमेलनाचे अध्यक्ष झाले नाहीत. १९५५मध्ये मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष (परळी वैजनाथ) म्हणून डॉ० ना०गो० नांदापूरकर यांची निवड झाली. १९६७मध्ये जालना येथे भरलेल्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते, प्रा० भा०शं० कहाळेकर. प्रो० र०म० भुसारी (१९६८ मध्ये) लातूरला भरलेल्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते, तर १९८२मध्ये झालेल्या अंबड येथील मराठवाडा साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान डॉ० श्री० रं० कुळकर्णी यांना मिळाला होता.

१९५३ ते १९५८ या कालखंडात साहित्य अकादमीच्या पहिल्या मराठी सल्लागार समितीचे सदस्य डॉ० ना०गो० नांदापूरकर होते. हाच मान पुढे १९६८ ते १९७३ डॉ० श्री०रं० कुळकर्णी व १९८३ ते ८८ या काळात डॉ० उषा जोशी यांना मिळाला.

काही सन्मान पूर्वीच्या परिस्थितीतच उपलब्ध नव्हते, याचा निर्देश वर आलाच आहे. विद्यापीठ अनुदान मंडळातर्फे मिळणाऱ्या सन्मानाचा यात अंतर्भाव करावयास हवा. उस्मानिया विद्यापीठाच्या मराठी विभागात हा मान प्रथम डॉ० श्री०रं० कुळकर्णी यांना मिळाला. १९७८ ते ८१ या काळात डॉ० श्री०रं० कुळकर्णी यांना मंडळाने सन्माननीय प्राध्यापकपद बहाल केले. याच मंडळातर्फे डॉ० वसंतराव कुलकर्णी यांना १९९० ते ९२ तर डॉ० माणिकराव धनपलवार यांना १९९१ ते ९३ फेलोशिप मिळाली. डॉ० धनपलवार यांना २००३ साली या साहित्य अकादमीचा भाषासन्मान लाभला. या सर्वच प्राध्यापकांच्या नावावर भरघोस साहित्यसेवा जमा आहे.

**अटकेपार झेप :** अभिमानाने सांगण्यासारखी बाब म्हणजे डॉ० वसंतराव कुलकर्णी यांना चार वेळा पाश्चात्त्य विद्यापीठांत सन्मानाने निमंत्रित केले गेले होते. त्यांनी चार शोधनिबंध तेथे सादर केले. एका सत्राचे अध्यक्षपदही भूषविले. आंतरराष्ट्रीय सूचीमध्ये नुकताच त्यांचा समावेश केला गेला. नांदापूरकरांनी मराठीबद्दल जो विश्वास प्रगट केला. 'ऐकोनिया स्फूर्ती खेळेल लोकी पुन्हा लंघुनि जावया नर्मदा', तो विश्वास केवळ नर्मदाच नव्हे; तर समुद्र ओलांडून तेथे 'मराठी' दिमाखाने मिरवली यातून सिद्ध झाला. मराठी विभागाचे हे यश व भाग्य.

**विद्यार्थ्यांची संख्या व सहभाग :** हे झाले प्राध्यापकांच्या बाबतीत. परंतु विद्यापीठात या विभागात विद्यार्थीच नसले तर त्या विभागाचे अस्तित्वच शून्यवत होईल. मराठी विभागातील विद्यार्थ्यांची संख्या हा कायम काळजीचा प्रश्न राहात आला आहे. आरंभी इंटर, बी०ए० व एम०ए० या विद्यार्थ्यांची संख्या उपलब्ध नोंदीप्रमाणे बेतास बेत राहिल्याचे

आढळते. १९५० नंतर काय किंवा १९५७ नंतर काय, धक्का बसेल एवढा चढउतार त्यात नाही. १९१९ साली विद्यार्थ्यांची संख्या १०+६ एवढी होती. १९३८ साली बी०ए०ला १६ तर एम०ए०ला तीन विद्यार्थी होते. १९४३-४४ला १४+२ तर १९४६-४७ला ही संख्या १८+१ अशी होती.

मराठीच्या प्रेमाचा जयजयकार करणे वेगळे, पण तिच्यापोटी वाटणाऱ्या आस्थेतून तो विषय आपल्या जीवनाचा, जगण्याचा किंबहुना पोटापाण्याचा प्रश्न करणे वेगळे. सामाजिक मानसशास्त्र दुर्लक्षून चालत नाही. १९२४ साली समाजात बी०ए० झालेले जेमतेम चार-पाच ( उस्मानियन ) आहेत व ते बेकार पडलेले आहेत अशी तक्रार श्री० लक्ष्मणराव फाटक यांनी केल्याची नोंद आहे. मराठीत प्रावीण्य मिळवून पुढे सरकण्याच्या सोयीसवलती असून असून कितीशा असणार? नव्वद वर्षांतील परिस्थितीत खरे तर संख्यात्मक वा गुणात्मक फरक पडलेला जाणवत नाही. देशातील, समाजातील, एकूण सांस्कृतिक जीवनच मुळी भाषाभ्यास करण्याइतके प्रगल्भ झालेले नाही. त्याचे जे काही बरेवाईट परिणाम असतील ते सर्वांनाच भोगावे लागतात. मराठी विभागाने ते भोगले आहेत. स्वातंत्र्यपूर्व काळात भोगले, १९५०-५७ नंतरही भोगले. यापुढे त्यात काही फरक पडेल, अशी आशा बाळगण्याचेही कारण दिसत नाही.

**विद्यार्थी-चळवळीचे संघटन :** भाषाप्रेमाची आणखी एक वेगळी बाजू आहे. अनेकांच्या जीवनात भाषाप्रेम असते. काही अंशी वाङ्मयप्रेम असते. पण त्यांचे जीवनहेतू भिन्न असतात. अशांची संख्या बरीच असते. आपले ईप्सित साध्य करीत असताना ही मंडळी भाषाव्यवहाराशी समरस होऊ शकतात. मराठी विभागाच्या स्थापनेपासून अशी अन्य विषयांशी संबंधित मंडळी मराठीच्या चळवळीशी समरस होत असत. अशी मंडळी विभागाभोवती या ना त्या निमित्ताने एकत्र आली आहेत. त्यांच्या या येण्यातून विद्यार्थी संघाची चळवळ मराठी विभागात फोफावली. १९५० पूर्वीचा काळ म्हटला तर प्रतिकूल, पण भावजागृतीच्या दृष्टीने अनुकूल. काही असो, त्याचा लाभ मराठी संघाला मिळाला, पर्यायाने मराठी विभागाला मिळाला. या चळवळीच्या १९५० पूर्वीच्या व नंतरच्याही नोंदी उपलब्ध आहेत. पण नावे संख्येने इतकी विपुल आहेत की, ती येथे देणेही अवघड आहे. या संघाच्या चळवळीमुळे विभागातील चैतन्य टिकण्यास मदत झाली व त्यातून पर्यायाने समाजाला मराठीचे प्रेम वृद्धिंगत करण्याचा मार्ग मोकळा झाला असावा.

या चळवळीचा भाग म्हणून 'प्रकाश' या वार्षिकाचा जन्म झाला. १९४५च्या सुमारास मराठी विभागातर्फे हस्तलिखित निघत असल्याचा उल्लेख आलाच आहे. पुढे त्याचेच रूपांतर 'प्रकाश'मध्ये झाले. याचे सर्व अंक मिळू शकले नाहीत. पण जेवढे मिळाले त्यावरून या वार्षिकामुळे विद्यार्थी व मराठी विभाग यांच्यातील संपर्क स्थिर स्वरूपात आला. १९६०-६२च्या सुमारास हे वार्षिक बंद पडले. विद्यार्थ्यांची होणारी





अनुक्रमणिका

वार्षिक संमेलने संख्येच्या अभावी रोडावली. त्यातून एकापेक्षा अधिक महाविद्यालयांची एकत्र संमेलने घेण्याची कल्पना पुढे आली. तीही कालांतराने आस्ते आस्ते अस्तंगत झाली.

**मराठीचे विभागप्रमुख :** मराठी विभागाचे पहिले विभागप्रमुख प्रो० चिं०नी० जोशी व सध्याच्या डॉ० शोभा देशमुख या कालावधीत एकूण ११ विभागप्रमुख झाले. सामान्यत्वे एकदा नियुक्ती झाली की ती त्यांच्या सेवाकाळापर्यंत राहण्याची प्रथा विद्यापीठाच्या सर्वसाधारण धोरणाप्रमाणे १९८४पासून खंडित झाली. तेव्हापासून दोन वर्षे एका व्यक्तीकडे ठेवण्याची नवी पद्धत सुरू झाली. त्यामुळे विभागात बरेच बदल सारखे होत गेले. त्यापूर्वीही पदोन्नतीच्या निमित्ताने बदल होण्याचा प्रसंग १९५२ साली आला होताच. सामान्यत्वे बदल म्हटला की त्यातून मानवी सुखदु:खे निर्माण होतात. या विभागातील मंडळी ही सर्व दु:खे पचवून त्यातून बाहेर पडून मोठी झाली व मराठीच्या सेवेत कार्यरत झाली. व्यक्तिगत बाबींना आवर घालण्याचे व विभागाचे कार्य प्रमुख मानण्याचे मनाचे मोठेपण वेळोवेळी सर्वांनी दाखविले. त्यातून चारित्र्याची एक परंपरा निर्माण झाली ती उज्ज्वलतेचा भाग म्हणून नोंदविलीच पाहिजे.

**संशोधनाचेही संघटन व दिशादिग्दर्शन :** संशोधनक्षेत्रातील व्यक्तिगत कार्य याच्या-बरोबर संघटित कार्य करून संशोधनाला दृष्टी देण्याचा उपक्रम हा विभागाने १९८१मध्ये घडविला. तो विद्यापीठ अनुदान मंडळाच्या सहकार्याने तीन आठवड्यांचा अभ्यासक्रम राबवून. त्यात हस्तलिखितांसंबंधी सर्व अंगांचा शास्त्रशुद्ध विचार मांडण्यात आला. त्यात तज्ज्ञ म्हणून अनेक नामवंत मंडळी आली व भारतातील अनेक विद्यापीठांतून मराठीचे संशोधन करणारे प्राध्यापक सहभागी झाले. या कृतिसत्राचे आयोजन व यशस्वी सांगता हे विभागाचे मोठे यश होते. दुर्दैवाने त्या वेळचे सबंध विचारमंथन अद्याप प्रकाशात आलेले नाही.

त्याप्रमाणे १९९०मध्ये 'ज्ञानेश्वरी' सप्तशताब्दीनिमित्त तीन दिवसांचे 'त्रिवेणी संगम' या नावाचे चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. त्यात मराठीबरोबर अन्य भाषांचा ज्ञानेश्वरीचा संदर्भ तपशिलाने न्याहाळला होता. पुनश्च १९९१मध्ये विभागाने 'ज्ञानेश्वरी'वर १८ दिवसांची व्याख्यानमाला आयोजित केली होती. त्यात तर विभागातील मंडळीबरोबर सबंध समाज तनमनधनाने सहभागी झाला होता. हा एक अनपेक्षित पण नवा अनुभव ठरला. मान्यवरांबरोबर नवीन जिज्ञासू मंडळींनी अभ्यासपूर्वक निबंध सादर केले. हस्तलिखिताच्या कृतिसत्राप्रमाणे या दोन्ही कार्यक्रमांतील अभ्यास व लेखन अद्याप अप्रकाशितच आहे.

**मराठी महाविद्यालयाचा अभिनव उपक्रम :** मराठी विभागाशी प्रत्यक्ष संबंध नसलेला पण मराठीच्या अध्ययन-अध्यापनाचा आणखी एक बलवत्तर दुवा म्हणजे मराठी महाविद्यालय. मद्रास इलाख्यातील फक्त भाषाअभ्यासाच्या धर्तीवर १९५३नंतर केवळ

भाषाभ्यास व तद्द्वारे पदवी ही कल्पना आंध्रात आली. दक्षिण भारतात व आंध्रात भाषाप्रेम व वाङ्मयप्रेम आधिक्याने आहे; हे निराळे सांगण्याची जरूर नाही. त्यातूनच या परीक्षा व तत्संबंधी शासकीय, विद्यापीठीय व्यवस्था आंध्रशासनाने स्वीकारली, नव्हे पुरस्कारिली. परिणामी सर्वच भाषांची मंडळे स्थापन झाली व त्यांची भरभराट झाली. त्यातून त्या त्या विभागाला बळ मिळाले. मराठीसाठी ही व्यवस्था अंमलात आणण्याची कल्पना प्रा० माढेकरांची. ती १९५८ पासून 'मराठी महाविद्यालया'च्या रूपाने अंमलात आली. कालांतराने सरकारने व विद्यापीठाने या संपूर्ण योजनेला अधिक सुव्यवस्थित व स्थिर स्वरूप दिले. आता तर विद्यापीठीय विभागात व इतर महाविद्यालयांत मोजके विद्यार्थी असले तरी येथे विद्यार्थी शेकड्याने मोजता यावेत एवढे असतात. गेल्या तीन वर्षांपासून ही संख्या सातत्याने २०० किंवा वरच आहे. तो सगळा तपशील येथे अनावश्यक आहे. पण कुणीकडून का होईना मराठीचे अध्ययन, अध्यापन, संशोधन, लेखन, प्रकाशन व सामाजिक चैतन्य या क्रिया चालू राहणे महत्त्वाचे. कुठे कमी, कुठे जास्त. यातील भूमिका 'न्यून ते पुरते' करून घेण्याची आहे व असणार आहे. काल प्रवाहाप्रमाणे त्यात अपेक्षित वाढ होत नसली तरी, आहे हेही नसे थोडके! १९१९ला आरंभ झालेला हा प्रवाह आता संथपणे चालू आहे. खडकाळ डोंगरदऱ्या केव्हाच मागे पडल्या आहेत. प्रत्यक्ष सागर तर पार क्षितिजापल्याड आहे. फक्त संथ वाहते आहे ती ही पुण्याई.

■

### ई-बुक्सचे फायदे काय?

'ई-बुक्स' तरुणाईमध्ये प्रचंड लोकप्रिय होण्याच्या मागे अनेक कारणे आहेत. अनेक 'ई-बुक्स' मोफत उपलब्ध असतात किंवा अत्यंत माफक किमतीत विकत घेता येऊ शकतील अशी असतात. कागदी बांधणीचे पुस्तक ने-आण करण्यासाठी गैरसोयीची असतात. पण 'ई-बुक' डाउनलोड करणे ही प्रक्रिया अत्यंत सोपी आहे. घाईगडबडीत दुकानात जा, पुस्तके पाहा, मग ती विकत घ्या इतके करण्याइतका वेळ तरुण वर्गाकडे नाही. अर्थात सहज उपलब्ध असल्याने तरुणाई 'ई-बुक'कडे वळली आहे. ही पुस्तके साठवून ठेवण्यासाठी अत्यंत कमी जागा लागते आणि 'ई-बुक्स'ची लायब्ररी सतत जवळ बाळगता येण्यासारखी असते.

महाराष्ट्र टाइम्स, १९ ऑगस्ट २०१३





अनुक्रमणिका

# गडहिंग्लज परिसराची भाषिक वैशिष्ट्ये

नीलेश केदारी शेळके

गडहिंग्लज तालुका हा कोल्हापूर जिल्ह्यातला दक्षिणेकडचा तालुका आहे. राजकीयदृष्ट्या हा तालुका जरी महाराष्ट्रात असला तरी कर्नाटक सीमाप्रदेश असल्याने जवळजवळ अर्धाअधिक तालुका कन्नड बोली असणाराच आहे. उर्वरित भागातील बोलीही निश्चितच वेगळी आहे. कोणत्याही दोन भिन्न भाषिक प्रदेशांच्या सीमारेषेवर, शेजारच्या भाषांचा परस्परांवर प्रभाव हा पडत असतोच. त्यामुळे सीमाभागातील बोलीभाषेचे एक निराळे रूप आपणास सापडते. गडहिंग्लज तालुक्याचा पूर्वभाग हा कन्नड सीमाप्रदेशाशी निगडित असल्याने कन्नड भाषेचा प्रभाव पडणे स्वाभाविक आहे. गडहिंग्लजच्या जवळपास ५० टक्के भूभागावर कन्नडचा प्रभाव आहे. या प्रदेशातले दैनंदिन व्यवहार कन्नड भाषेतूनच होतात. या प्रदेशातील लोकगीतांचे जेव्हा संकलन केले तेव्हा बहुसंख्य लोकगीते तर पूर्णतया कन्नड भाषेतीलच मिळाली. कारण इथला सामान्य, अशिक्षित माणूस हा मराठीपासून दूरच आहे. त्यामुळे त्याच्या व्यावहारिक जीवनात कन्नड वापर अधिक दिसतो. कन्नड भाषेचा मराठीवर जो प्रभाव पडला त्याचा अभ्यास करणे गरजेचे असल्याने तो करण्याचा प्रयत्न येथे केला आहे. इथल्या मराठी भाषेत प्रमाण मराठीपेक्षा काही वेगळे विशेष जाणवतात. इथल्या प्रदेशाची प्रदेशनिष्ठता इथल्या भाषेने जपली आहे, हे लक्षात येते. शेजारभाषेच्या संपर्काने काही व्याकरणिक बदल झालेले आहेतच, या सर्वातून जी काही भाषिक वैशिष्ट्ये जाणवली ती खालीलप्रमाणे :

( १ ) कन्नड भाषेच्या प्रभावामुळे सर्वात महत्त्वाचा परिणाम घडला तो इथल्या वाक्यरचनेवर. कन्नडमधून मराठीत केवळ शब्दच आले आहेत असे नाही, तर वाक्यरचनेवरही परिणाम झाला आहे. कन्नडमध्ये केवळ पुल्लिंगी आणि स्त्रीलिंगी रूपेच असतात. नपुसकलिंगी रूपे नसतात. कन्नड भाषेत पुल्लिंगी व स्त्रीलिंगीरूपासाठी क्रियापदाचे एकच रूप वापरले जाते. मराठीत मात्र ते रूप वेगवेगळे असते. या लोकांना मध्यवर्ती मराठीप्रमाणे क्रियापदांची रूपे लक्षात येत नाहीत. त्यामुळे बहुसंख्यवेळा क्रियापदांचे लिंगच बदललेले दिसते. हे केवळ कन्नड प्रभावाच्या क्षेत्रात घडते असे नाही तर गडहिंग्लज तालुक्यातील इतर भागांवरही हा प्रभाव पडल्याचे दिसते.

उदा० : मी आंघूळ केलो. मुलगी गावाला गेलं

परवा एक घर बघितलो.
माजं पोरगी ते.
माझी विद्यार्थिनी आलं.
चर्चा झालं.

मी फोन केलो.
काल मी माझं एक शर्ट धुतलं.
असं मी प्रार्थना करतो.
महत्त्वाची काम केलं

( २ ) विभक्तीचे योग्य प्रत्यय वापरलेले दिसत नाहीत.

उदा०

घराचं वास्तूशांती हाय.
आमचं मामानं आंब्याची झाड तोडलं.
आमचं वहिनी आत्ताच आलंय, आत हातपाय धूतंय.
मीनं बघितलं.
मीनं सांगितलंय तसं कर.

( ३ ) बहुतेक वेळा संयुक्त क्रियापदेच वापरली जातात.

उदा० : उभा राहिलो - हुभारलो    यायचं आहे - याचाय
येत आहे - येताव    जात आहे - जाताव
भरलं होतं - भरलंतं    भीती दाटली होती - भ्या दाटलतं
गेला होता - गेलता/गेलाता

( ४ ) काही वेळा क्रियापदांची वेगळीच रचना केलेली दिसते.

- नकारार्थी वाक्यांत क्रियापदे वेगळ्या पद्धतीने वापरली जातात.
  उदा० : बोलाय न्हाय, कराय न्हाय, बघाय न्हाय, जाया न्हाय, वळकाय न्हाय, आल्यान, गेल्यान.
- होकारार्थी वाक्यांतील रचना वेगळी आहे.
  उदा० : बघताव, येताव, जाताव, बसताव, पाऊस पडायलाय, लोकं पेरायल्याती, करुनश्यान, बघूनश्यान, बघितल्यान, सांगितल्यान, आल्यान, गेल्यान, करायलास, बघायलास.
- काही वेळा क्रियापदावर जोर देण्यासाठी क्रियापदाला प्रत्ययही जोडले जातात.
  उदा० : व्हयबा, न्हायबा, कायकी, आलाताकी.

( ५ ) 'ऐ'च्या ऐवजी 'आय' आणि 'औ'च्या ऐवजी 'अव' वापरले जाते.

उदा० : ऐकलं - आयकलं    पौळा - पवळा
दौलत - दवलत    सौदा - सवदा
औषध - वशीद

( ६ ) या परिसरातील स्त्रियासुद्धा पुल्लिंगीच बोलतात.

उदा० : मी म्हायाराला जावून येतो. कवाधरनं वाट बघतोय मर्दिनी.

मी घराम्होरं हुभी होतो.

हा विशेष लोकगीतांमध्ये, उखाण्यांमध्येही आपणांस पाहायला मिळतो.

१. सरलं दळण माजं, सरता आरती कापरीची,
   माज्या ग कुंकवासाठी, सेवा करतो शंकराची.

२. फुलांचा हार गौराईच्या गळ्यात....रावांचं नाव घेतो बायकांच्या मेळ्यात.

( ७ ) सर्वनामांच्याबाबतीतही बोलीतील वेगळी रूपे या परिसरात सापडतात, ती अशी :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| आमास्नी | तुमास्नी | त्यास्नी | तेनास्नी | त्यास |
| मीनं | तूनं | म्या | त्वा | तुमी |
| आमी | आपून | मिया | तेनं | तेनी |
| आमच्यात | त्येंच्यात | | | |

( ८ ) 'ह' वर्णाबाबतीत काही वेळा वर्णविपर्यय घडलेला दिसतो.

| | | |
|---|---|---|
| पाहुणा - पावणा | शहाणी - शाणी | पहिला - पयला |
| चहाडी - चाडी | उन्हात - उनात | सहा - सा |
| दूध - दूद | नवरा - न्हवरा | नेली - न्हेली |
| महादेव - म्हादेव | | |

( ९ ) बऱ्याच ठिकाणी वृद्धी होताना दिसते. सुरुवातीला येणाऱ्या 'अ' ऐवजी बहुतेकवेळा 'आ' हे रूप वापरले जाते.

उदा० : असा - आसा    असे - आरं    असतो - आसतो/आस्तो
        अशी - आशी    अजिबात - आजीबात

(१०) हा प्रदेश सीमारेषेवरील असल्याने अनेक वेगळे शब्द या परिसरात वापरले जातात. हे शब्दच त्या परिसराची ओळख असतात.

असे काही शब्द : डोंगळा, पेट्ट बसला, कुरी, इरलं, इगत, इसाळ, गेळा, एक्का, काचबारणे, गापक्यान, कावबारणे, आरडाबोंबी, भिन्नटल्यागत, गुतपाळणे, धूळपेर, धूळाप, दोपार, लेकावळा, रयत, शुव्या, वशीद, घरोसा, खांडूक, म्हायी, डोचकं, बेचक्यात, खोचकू नको.

तसेच घराला नवीन रंग दिला असेल तर 'रंग दिला' असे म्हणण्याऐवजी 'रंग काढलाय' असे म्हटले जाते.

अशा अनेक शब्दांतून, भाषेच्या विशेषांतून, व्याकरणिक रचनेतून या प्रदेशातील मराठीची वेगळी वैशिष्ट्ये आपणास सापडतात. या तालुक्यातील भाषेवर पूर्व भागात कन्नडचा प्रभाव, पश्चिम भागात कोकणीचा प्रभाव तर दक्षिणेकडच्या भागात चंदगडी, बेळगावी, कारवारी बोलींचा प्रभाव पडला आहे.

■

# अडचण भाषेची

सुधीर रा० देवरे

एक बिगर अहिराणी भाषक पण मराठी भाषक माणूस सटाण्याला नोकरीच्या निमित्ताने घर करून राहायचा. नोकरीचा भाग म्हणून त्याला आजूबाजूच्या खेड्यांवरही जावं लागे. आमचा दोघांचा चांगला परिचय झाला होता. एके दिवशी काही कामामुळे तो घरी आला. बोलता बोलता अहिराणी भाषेचा विषय निघाला म्हणून त्याने मला सांगितले, ''इथे अहिराणी बोलणारे लोक एवढ्या तेवढ्या कारणावरून कोणालाही काहीही शिव्या देतात, हे काही बरे नाही राव.'' मी विचारलं, ''काय झालं?'' त्यांच्या बोलण्यावरून त्यांना चांगला अनुभव आलेला नाही. ते अहिराणी भाषकाकडून दुखावले गेले असे लक्षात आले. त्यांच्या मनात अहिराणी भाषकाबद्दल अढी निर्माण झाल्याचे जाणवले. त्याला त्याचा अनुभव सांगायचा मी आग्रह केल्यावर तो सांगायला लागला.

मी एका गावाला मळ्यात गेलो होतो. तर एक बाईने मला डायरेक्ट 'भाड्या' म्हणून शिवी दिली. एवढंच सांगून तो गप्प बसला. मी म्हटलं, ''ही घडलेली घटना मला जरा खोलात जाऊन सांग ना. अगदी जशी घडली तशी.'' त्याने सर्व घटना जशी घडली तशी सांगायला सुरुवात केली. ती घटना अशी होती :

सटाणा जवळच्या एका खेड्यातील शेतात नोकरीचा एक भाग म्हणून तो त्याच्या सहकाऱ्याबरोबर गेला होता. त्या सहकाऱ्यालाही अहिराणी भाषा येत नव्हती. तिकडून आपले काम आटपून परत पायी येताना एका शेतातून यावे लागायचे. येताना ते बांधावर न चालता खाली शेतातून चालत होते. एक जण बांधावरून तर दुसरा शेतातून असे बोलत बोलत चालले होते. खरं तर त्यांना एकामागून एक असे करत दोघांनाही बांधावरून चालणे शक्य होते. तेवढ्यात शेताच्या मालकिणीने त्यांना बाजरी पेरलेल्या शेतातून तसे चालताना पाहिले. आणि ती ह्यांना म्हणाली, ''काय रे भड्या, पैरेल वावर शे ना, बांधवरतीन चालत नी.''

अशी ही घटना होती. अहिराणी भाषा बारकाव्यांसह येत नसल्यामुळे - समजत नसल्यामुळे त्यांनी 'ध'चा 'मा' करून टाकला होता. 'भड्या'चा 'भाड्या' करून ते कारणाशिवाय नाराज झाले होते, हे माझ्या लक्षात आले. त्याला वाटलं, माझ्याकडून शेतातून चाललं गेलं असेल तरी ह्या बाईने मला डायरेक्ट भाड्या म्हणावं काय? त्याचे बोलणे ऐकून मला हसू आलं आणि मी त्यांच्या समोर मुद्दाम हसून वातावरण निवळण्याचा

प्रयत्न केला. तो म्हणाला, ''तुम्हाला घटना सांगितली आणि शिवीही. तरीही तुम्ही हसता? कमाल आहे. आमच्याकडे खूप मोठे भांडण झाल्याशिवाय अशी शिवी कोणी कोणाला देत नाही सहजासहजी. इकडच्या भागातले लोक खूप तुसडे आणि उद्धट आहेत, हे आता तुम्हीही मान्य केलं ना?

मी पुन्हा त्यांना म्हणालो, ''बरं झालं हे तुम्ही मला सांगितलं. नाहीतर अहिराणी भाषेबद्दल तुमच्या मनात कायमची अढी तयार झाली असती. अहिराणी भाषा खूप गोड आहे; बरं का!''

तो म्हणाला, ''मग त्या बाईने एवढ्या तेवढ्या कारणावरून मला भाड्या कसे काय म्हटलं?''

''त्या बाईने तुम्हाला भाड्या म्हटलंच नाही आणि शिवीही दिली नाही. ही शिवी नाही.''

''कशी नाही? ती शिवी मी स्वतःच्या कानाने ऐकली आणि तुम्हांलाही सांगितली ना आता.''

''तुम्ही ऐकली ती शिवी नव्हती. तुम्ही भाड्या ऐकलं; पण ती बाई म्हणाली, 'भड्या.' भाड्या म्हणो की भाड्या दोघांचा अर्थ तर एकच झाला ना?''

''नाही. मुळीच नाही. 'भड्या' ह्या अहिराणी शब्दाचा अर्थ आहे, अरे भल्या माणसा!'' म्हणजे ती बाई तुम्हाला म्हणाली, ''ये भड्या (अरे भल्या माणसा) वावरमा आत्ताच आम्ही बाजरी पैरेल शे. बांधवरतीन चालतनी. पण अहिराणी भाषेचा नीट परिचय नसल्याने तुम्हाला त्या बाईचा भड्या हा शब्द भाड्या असा ऐकू आला. आणि त्याचा अर्थ तुम्ही तुमच्या परिचयाच्या शब्दातून शोधला. म्हणून ही घटना ऐकून मी हसत होतो.''

मी बोलत असताना त्याच्या चेहऱ्यावर समाधान पसरताना दिसले. भड्या आणि भाड्या ह्या शब्दांत एका कानाचा फरक असला तरीही किती अनर्थ झाला होता. बिगर अहिराणी भाषकाच्या मनात अहिराणीबद्दल अढी निर्माण होऊ लागली होती. त्याने जर मला हे सांगितले नसते तर ही अढी त्याच्या मनात कायमची राहिली असती. त्याच्या गावाकडे विषय निघाला असता आणि त्याने अहिराणी लोकांचा हा उद्धटपणा तेलमीठ लावून सांगितला असता. ऐकणाऱ्यांनीही ऐकून गैरसमज करून घेतला असता.

हे स्पष्टीकरण ऐकून तोही चकित झाला आणि मोकळा होऊन हसायला लागला. तो म्हणाला, ''मी हे तुम्हाला कधीचे सांगू सांगू असे ठरवत होतो. बरं झालं आज सांगितलं. नाहीतर 'भड्या'चा 'भाड्या' समजून मी अहिराणी लोकांचा आणि भाषेचा कायम दुस्वास केला असता! तुम्ही भाषेचे अभ्यासक आहात. अहिराणीवर लिहिता म्हणून म्हटलं हे सांगू आणि तुमच्या भाषेच्या उद्धटपणाचे तुम्ही कसे समर्थन करता, असे मला विचारायचं होतं.

ह्या 'भड्या'सारखाच अहिराणीत 'रांडना' हा शब्द मला लहानपणासून मनात खटकून राहिला होता. एक सोबती दुसऱ्या मित्राला सहज म्हणतो, ''काय रे रांडना, कैन्हना कथा गयथा?'' आणि दुसऱ्या सोबतीलाही रांडना ही शिवी वाटत नाही.

तो शांतपणाने उत्तर देतो, ''नही रे भो, आठेच व्हतू पन वावरात जानं पडस रोज, म्हणीसन इऊ ना!''

खालीलप्रमाणे संवाद तर नेहमीच ऐकायला मिळतात :

''हे रांडना, दुकानातील माले बिड्या आनि देत नी.''

''काय रे रांडना, तू इतिहासनं पुस्तक धिदं का?''

असे 'रांडना' हा शब्द प्रत्येक वाक्यात अहिराणी पोरं सोरं आणि मोठे लोकही ग्रामीण भागात सहज वापरतात. दुसरेही पहिल्याला पुन्हा अगदी सहज 'रांडना' म्हणतात. आणि काहीच झाले नाही असा सहज प्रतिसाद देतात. म्हणजे ह्या रांडना शब्दाची शिवी दोन्ही बाजूने असते. एकतर्फी नसते.

'रांडना' ह्या शब्दाचा मराठीत अनुवाद केला तर 'रांडेचा' असा अर्थ होईल. 'रांड' ह्या शब्दाचे मराठीत दोन अर्थ आहेत. तमाशात जी बाई नाचते ती रांड आणि वेश्येलाही रांड म्हणतात. (अहिराणीत विधवा बाईला रांडकी म्हणतात. म्हणून हा शब्द पुन्हा रांडपेक्षा वेगळा आहे.) म्हणजे रांडना ह्या शब्दाचा मराठीत अर्थ रांडचा मुलगा असा होईल. पण अशी समीक्षा बोलीभाषेत कोणी करत नाही. लोक हे शब्द सामान्य नामासारखेच रोजच्या व्यवहारात वापरतात. असे शब्द व्यवहारात कसे रूढ झाले असतील याची चर्चाच फक्त आपल्याला करता येईल. कायम आदेश देणाऱ्या माणसाच्या तोंडात रांडना हे संबोधन अहिराणीत लवकर येते. म्हणून असे आदेश देणाऱ्या माणसांमार्फत हे संबोधन अहिराणीत रूढ झाले असावे.

अहिराणी भाषेमधल्या (खरं तर सगळ्याच बोलींमधल्या) अशा संज्ञांचा आपंण उदारपणाने विचार करायला हवा. तसा नीट विचार केला नाही तर 'ध'चा 'मा' होऊन जातो. म्हणजेच 'भड्या' चा 'भाड्या' होऊन जातो. तो होऊ नये म्हणून भाषेच्या अभ्यासाशिवाय पटकन कोणत्याही भाषेला उद्धट, अश्लील, गावठी ठरवून मोकळे होणे म्हणजे आपणच तोंडघशी पडल्यासारखे होणार आहे. ■

**अभिनंदन!**

ज्येष्ठ कवी व 'आपले वाङ्मयवृत्त'चे संपादक सतीश काळसेकर यांच्या 'वाचणाऱ्याची रोजनिशी' या लेखसंग्रहाला साहित्य अकादमीचा पुरस्कार जाहीर झाला आहे. त्याबद्दल त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन!

# एक दुर्मीळ व्यक्तिमत्त्व : ह०अ० भावे

शरद गोगटे

वरदा बुक्स व सरिता प्रकाशन अशा दोन प्रकाशन संस्थांच्या माध्यमातून १९७३ ते २०१३ अशी चार दशके मराठी प्रकाशन क्षेत्रात सातत्याने भरीव कामगिरी करणाऱ्या ह०अ० भावे यांचे १८ जून २०१३ रोजी निधन झाले. निधन झाले तेव्हा त्यांना ब्याऐंशीवे वर्ष चालू होते. वयाची चाळिशी उलटल्यानंतर त्यांनी प्रकाशन व्यवसायात पदार्पण केले होते. तोपर्यंत त्यांचा ग्रंथव्यवहाराशी व्यावसायिक म्हणून अर्थाअर्थी काहीही संबंध नव्हता. ते शिक्षण, नोकरी, व्यवसाय सर्वच दृष्टींनी एक स्थापत्य अभियांत्रिक होते. वयाच्या एक्केचाळिसाव्या वर्षी, आपल्या व्यवसायात उत्तमप्रकारे स्थिरावलेला बांधकाम व्यावसायिक आपला व्यवसाय गुंडाळून, गाव सोडून पुण्याला येतो आणि मराठी ग्रंथप्रकाशनासारखा बेभरवशाचा व्यवसाय सुरू करतो, ही काहीशी अतर्क्य वाटणारी गोष्ट १९७३ साली भाव्यांनी केली आणि पुढील चाळीस वर्षे एक प्रकारच्या मस्त धुंदीत ते पुस्तके प्रकाशित करीत राहिले.

आयुष्याची पहिली चाळीस वर्षे त्यांचा ग्रंथव्यवसायाशी संबंध नव्हता. परंतु पुस्तकांशी मात्र घनिष्ठ संबंध होता. ते एक चतुरस्र व गाढे वाचक होते. वाई येथील शालेय जीवनापासूनच त्यांना वाचनाचा प्रचंड नाद होता. शाळेचा व नित्यनैमित्तिक आन्हिकांचा वेळ वगळता ते सारा वेळ वाईच्या सार्वजनिक ग्रंथालयात बसून पुस्तके वाचण्यात घालवत असत. ग्रंथालयाची वेळ संपली तर यांचे वाचन चालूच असे. पुष्कळदा ग्रंथालयाचे कर्मचारी भावे यांच्यावर ग्रंथालय बंद करायची जबाबदारी टाकून निघून जात असत. याच काळात बहुधा त्यांच्याही नकळत त्यांच्या मनात एका प्रकाशकाने प्रवेश केला आणि तेथेच तो लपून बसला. अर्थार्जनाच्या गरजेखातर भावे स्थापत्य अभियांत्रिकी शिकले, त्याच क्षेत्रात त्यांनी नोकरी केली व नोकरी सोडून बांधकाम व्यावसायिक झाले. उत्तमप्रकारे व्यवसाय करून त्यांनी आर्थिक स्थैर्य मिळवले. या स्थैर्याच्या आधारावरच त्यांच्या मनात लपून बसलेल्या ग्रंथप्रकाशकाने बहुधा उचल खाल्ली आणि सकृत्‌दर्शनी अव्यवहार्य वाटणारी उडी घ्यायला ते प्रवृत्त झाले.

स्वत:च्या वाचनाच्या छंदामुळे त्यांनी विविध विषयांतील वाचन केलेले होते. पुस्तकांचे विषय आणि अनेक कल्पना त्यांच्या मनात घोळत होत्या. त्यांना आकार द्यायचा होता. वाईच्या ग्रंथालयात व इतरत्रही वाचलेली आणि बघितलेली पुस्तके त्यांच्या मनात रुजलेली

होती. त्यातील अनुपलब्ध झालेली पुस्तके त्यांना परत उपलब्ध करून द्यायची इच्छा होती. या स्वप्नांचा सातत्याने मागोवा घेता येण्यासाठी व्यवसायाची आर्थिक बाजू व्यवस्थित सांभाळली पाहिजे याची व्यावहारिक जाणीव त्यांना होती. म्हणूनच व्यवसायाचा पाया मजबूतरीत्या रचण्यासाठी त्यांनी सुरुवातीला लोकांना आवश्यक, उपयुक्त व संग्राह्य वाटतील अशीच पुस्तके प्रकाशित करायला घेतली. स्वेट मॉर्डनसारख्या लेखकाच्या स्वयं-प्रगतीला उपयुक्त पुस्तकांची भाषांतरे, शेरलॉक होम्सच्या चातुर्यकथा, स्पर्धापरीक्षा वगैरेला उपयुक्त ठरेल असे सामान्य ज्ञानाचे पुस्तक आणि लोकांना संग्राह्य वाटणारे रामायण-महाभारतासारखे ग्रंथ ही त्यांची सुरुवातीच्या दशकातील प्रकाशने. हे सर्व प्रयोग यशस्वी ठरले. त्यांनी संपूर्ण रामायण व संपूर्ण महाभारत या ग्रंथांच्या सवलतीच्या तीन आवृत्त्या काढल्या. त्यांचे अनुकरण करून इतर प्रकाशक हे ग्रंथ प्रकाशित करू लागल्यावर नसती स्पर्धा करण्यात ताकद खर्च करण्यापेक्षा हे ग्रंथ प्रकाशित करायचेच त्यांनी थांबवले. सामान्य ज्ञानाच्या पुस्तकाच्या बाबतीतही त्यांनी हेच धोरण अवलंबले. परंतु उपयुक्त पुस्तकांचे व्यावहारिक महत्त्व त्यांनी कधीही नजरेआड होऊ दिले नाही. ‘आत्मविकास’ या प्रकारातली पुस्तके सतत काढत राहिले. २०१३च्या मार्च महिन्यात काढलेल्या त्यांच्या सूचीत या प्रकारची सुमारे १५० उपलब्ध व १५ आगामी पुस्तके समाविष्ट आहेत. याशिवाय सुभाषिते, उक्तिसंग्रह, इंग्रजी अवतरणे या प्रकारची अनेक पुस्तके ते नेहमी काढत राहिले. ‘पाठांतर कोश’ (इंग्रजी, मराठी)सारखे याच प्रकारचे पुस्तक ही त्यांची स्वत:ची क्लृप्ती. लहानपणापासून पाठ केलेल्या, माहिती असलेल्या स्वत:च्या ज्ञानाच्या जोरावर त्यांनी स्वत:च अनेक प्रकारचे लहानमोठे कोश, सुभाषित संग्रह इत्यादी स्वत:च संपादित करून प्रकाशित केले. हा सर्व व्याप व्यवसायाची आर्थिक बाजू भक्कम राहावी व आपल्याला हवी ती पुस्तके, त्यांच्या आर्थिक यशापयशाची फारशी काळजी न करता काढता यावीत यासाठी. त्यांना प्रकाशित करायचं होते ते मराठीतील दुर्मीळ अक्षरधन. किंबहुना तेच खऱ्या अर्थाने त्यांच्या प्रकाशन संस्थेचे वैशिष्ट्य होते.

लहानपणापासून वाचलेली, बघितलेली अनेक मराठी पुस्तके त्यांच्या मनात होती. शोधक नजरेने त्यांनी पदपथावरील पुस्तक विक्रेत्यापासून तसेच इतर अनेक ठिकाणांहून मराठीत पूर्वी प्रकाशित झालेल्या व आता दुर्मीळ असलेल्या ग्रंथांचा संग्रह केला होता. त्यातील विविध ग्रंथ त्यांना पुनर्मुद्रित करून लोकांना परत उपलब्ध करून द्यायचे होते. ज्या पुस्तकांचे उल्लेखच कदाचित नव्या पिढीच्या वाचनात येत असतील ती पुस्तके वाचकांना उपलब्ध करून द्यायची होती. त्यात गो०ना० दातारांच्या कादंबऱ्या, नाथ माधवांच्या कादंबऱ्या यापासून न्यायमूर्ती रानडे यांचे ‘मराठी सत्तेचा उत्कर्ष’, हिवरगांवकरांचे ‘कौटिलीय अर्थशास्त्र’ यापर्यंतच्या विविध अभ्यासपूर्ण ग्रंथांचा समावेश होता. त्याशिवाय आठ खंडांचा ‘महाराष्ट्र शब्दकोश’ (दाते-कर्वे), तेवीस खंडांचा

'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' (श्री०व्यं० केतकर) हे सर्व ज्ञानभांडार त्यांनी पुन्हा उपलब्ध करून दिले.

जुन्या अनुपलब्ध परंतु अभ्यासकांना व ग्रंथप्रेमींना आवश्यक अशा पुस्तकांचा मागोवा घेताघेता ते 'लोकसाहित्याची रूपरेषा' या पुस्तकासाठी दुर्गाबाई भागवतांना भेटले. या भेटीतून भावे-भागवत यांच्या दीर्घ व घनिष्ट अशा प्रकाशक-लेखक संबंधाची सुरुवात झाली. दुर्गाबाईंनी संपादित केलेले 'राजारामशास्त्री भागवतांच्या निवडक साहित्याचे सहा खंड', सिद्धार्थ जातकांचे सात खंड, 'अस्वल', दुर्गाबाईंच्या लोककथा मालेतील ३९ पुस्तके असे बहुविध साहित्य भाव्यांनी प्रकाशित केले.

भाव्यांना कोणताही विषय वर्ज्य नव्हता. त्यांचे कुतूहल वा त्यांची पसंती एवढाच निकष पुस्तकाची प्रकाशनसाठी निवड करताना पाळला जात होता. 'लंडन येथील बड्या लोकांची गुप्त कृत्ये' (मूळ लेखक : रेनॉल्डस् - भाषांतर : मांडे)सारख्या पुस्तकापासून बा०आ० गुप्ते यांच्या 'भारतीय हस्तकला स्वरूप व इतिहास'सारख्या उत्कृष्ट अभ्यासग्रंथापर्यंत सर्व प्रकारची दुर्मीळ पुस्तके त्यांनी पुनर्मुद्रणासाठी निवडलेली दिसतात. भाव्यांनी स्वतंत्रपणे लिहिलेली नव्या लेखकांची पुस्तके त्या मानाने कमी प्रमाणात प्रसिद्ध केली. परंतु त्यातही नातूंच्या 'आधीच पुणे गुलजार'सारख्या पुस्तकापासून वालावलकरांच्या श्रद्धा व अंधश्रद्धांविषयीच्या 'देव, धर्म, श्रद्धा आणि विवेक विचार'सारख्या पुस्तकांपर्यंत विविध विषयांची पुस्तके आढळतात. त्यामुळेच त्यांच्या प्रकाशनांची सूची चाळणेही मनोरंजक ठरते. ती वाचता वाचता सूचीतील अनेक पुस्तके तुम्हांला खुणावू लागतात. इतकी वैविध्यपूर्ण प्रकाशने करणे हे केवळ पुस्तकप्रेमामुळे व त्याबाबतच्या दुर्दम्य उत्साहामुळेच शक्य होते. प्रकृती फारशी साथ देत नसताना अलीकडेच त्यांनी 'संपूर्ण साने गुरुजी' या प्रकल्पात ४६ पुस्तके प्रकाशित केली व 'समग्र महाकवी कालिदास' या महत्त्वाकांक्षी प्रकल्पाला सुरुवात केली. 'दिसामाजी काहीतरी ते लिहावे' हा परिपाठही त्यांनी अखंड पाळला. भाव्यांनी लिहिलेले न्यायमूर्ती माधवराव रानडे यांचे चरित्र प्रकाशित झाले असून त्यांचे आत्मचरित्रही प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

डोंबिवलीला १९९१ साली झालेल्या सातव्या मराठी प्रकाशक संमेलनाच्या अध्यक्ष-पदावरून बोलताना भावे म्हणाले होते, ''माझा मूळचा व्यवसाय सोडून मी यात (प्रकाशन व्यवसायात) आलो आहे ते स्वान्त सुखासाठी''. शेवटपर्यंत याच वृत्तीने त्यांनी या व्यवसायातील रोमांच अनुभवत, सुरुवातीला म्हटल्याप्रमाणे एक प्रकारच्या मस्त धुंदीत प्रकाशनांचे प्रयोग केले. त्यांनी दुर्मीळ होणारे अनेक ग्रंथ पुनर्मुद्रित करून ते नजरेआड होऊ न देण्याचे जे कार्य केले आहे, त्यासाठी सर्व मराठी ग्रंथप्रेमी त्यांचे कायम ऋणी राहतील हे निश्चित.

■



अनुक्रमणिका

# मराठी भाषाध्यापनाच्या आधुनिकीकरणाचा प्रकल्प

कलिका मेहता

विविध कारणांनी परप्रांतात आलेल्या अल्पसंख्य अन्यभाषकांची समाजाशी तादात्म्य पावण्याची धडपड चालू असते. त्या समाजगटाची जीवनसरणी, त्यांचे परस्परसंबंध, सामाजिक प्रश्न याबद्दलचा परकेपणा कालांतराने कमी होऊ लागतो. आपली भाषिक अस्मिता टिकवून ठेवत असतानाच, प्रधानभाषेशी संपर्क येणे अटळ असल्यामुळे सुरुवातीला मोडक्या-तोडक्या कामचलाऊ भाषेचा वापर करून गरजा भागवल्या जातात. पण कालांतराने ती समृद्ध भाषा आपलीशी करणे गरजेचे वाटू लागते. कधी उद्योगधंद्यात जम बसवायचे कारण प्रबळ ठरते तर कधी सरकार-दरबारचे किंवा शैक्षणिक धोरण ती भाषा शिकणे अनिवार्य ठरवते. शिवाय अलीकडे जागतिकीकरणामुळे जग अधिकाधिक जवळ येत असताना, भाषांचा प्रसार आणि प्रचार हे देशाच्या आर्थिक विकासाच्या अनेक साधनांपैकी एक साधन ठरू शकते. भारतीय भाषांच्या बाबतीतही हे सत्य आहे. देशस्तरीय व राज्यस्तरीय शासनसंस्था, उद्योगधंद्यांच्या विकासासाठी प्रयत्नशील असणाऱ्या संस्था, संशोधनाला वाहून घेतलेल्या संस्था, संशोधक, पर्यटक, अभ्यासक - मग ते परदेशी असोत वा परप्रांतीय - या सर्वांना भारतीय भाषांच्या अध्ययनाच्या संधी उपलब्ध करून देण्याची गरज वाढते आहे. अध्ययनाच्या संधी उपलब्ध करून देणे म्हणजेच त्यांना त्या भाषा उत्तम शिकवल्या जातील याची व्यवस्था करणे. अशा प्रकारची व्यवस्था करण्यामध्ये उत्तम अध्यापनतंत्राचा विकास हा ओघाने आलाच.

आपल्याकडे शालेय पातळीपासून भाषाविषय असतो. परंतु एकतर भाषा शिकवणे आणि त्या भाषेत उपलब्ध असणारे दर्जेदार वाङ्मय शिकवणे या दोन गोष्टींची तिथे गल्लत केली जाते. दुसरे म्हणजे निजभाषकांच्या भाषाकौशल्यांचा विकास घडवून आणणे आणि अन्यभाषकांच्या अंगी भाषिक कौशल्ये बाणवणे या दोन्ही गोष्टी मूलतः वेगळ्या आहेत याचेही पुरेसे भान नसते.

परिणामी परप्रांतात पुरेसा कालखंड व्यतीत करूनही अनेकांना तिथल्या भाषेच्या खाचाखोचा, बारकावे उमगतच नाहीत आणि नकळत सर्व भाषिक व्यवहार त्या भाषेचा वापर टाळून करण्याकडे त्यांचा कल दिसतो. महाराष्ट्रात मराठीच्या बाबतीत असेच काहीसे झालेले दिसून येते. मराठीत व्यवहार करण्याची सक्ती राज्यकर्त्यांनी करूनही महाराष्ट्राच्या सांस्कृतिक राजधानीत, पुण्यातसुद्धा हिंदी बोलून कामे पार पाडता येतात. केवळ

दुकानांवरच्या पाट्या बदलून साध्य होण्यासारखे हे ध्येय नाही. जोपर्यंत भाषेच्या अंतरंगात शिरण्याची कळ अन्यभाषकाला सापडत नाही किंवा आपण ती त्याला सापडवून देत नाही तोपर्यंत भाषेबद्दल मनात प्रेम जागणे कठीण आहे. भाषेबद्दल प्रेम निर्माण झाल्यानंतरच अन्यभाषक त्या भाषेच्या वापरासाठी उद्युक्त होईल. मुंबई-पुण्यात अमराठी भाषकांना व्यावहारिक मराठीचे शास्त्रशुद्ध धडे देण्याचा प्रयत्न अजिबातच झालेला नाही असे नाही. मुंबईत 'मुंबई मराठी साहित्य संघा'त, पुण्यात 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'त मराठीचे वर्ग चालवले जात असत. केंद्रसरकारच्या मैसूरस्थित 'भारतीय भाषा संस्थान'च्या पुणे येथील 'पश्चिम विभागीय भाषा केंद्रा'त १९७०पासून अमराठी शिक्षकांना मराठीचे प्रशिक्षण दिले जाते. अलीकडे पुणे विद्यापीठात अमराठी भाषकांसाठी मराठीचे वर्ग सुरू झालेले आहेत. पुण्यात डेक्कन कॉलेजच्या आवारात असलेल्या 'अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन स्टडीज'मध्ये अमेरिकन विद्यार्थ्यांना मराठी शिकवले जाते. 'असोशिएटेड कॉलेजिस ऑफ मिडवेस्ट'तर्फेही अमेरिकन विद्यार्थी पुण्यात मराठी शिकायला येतात.

तरीही या वर्गांमध्ये ज्या विचारप्रणालींवर अभ्यासक्रम आखले गेले आहेत. शैक्षणिक सामग्री तयार केली गेली आहे आणि अध्यापनाच्या ज्या पद्धतींचा व तंत्रांच्या अवलंब करून मराठी शिकवले जाते त्या काही प्रमाणात आता कालबाह्य झाल्याचे लक्षात आले आहे. म्हणूनच मराठी भाषेच्या अध्यापनाचे आधुनिकीकरण करण्यासाठी मुंबई विद्यापीठातील जर्मन भाषा विभागाने पुढाकार घेतला आहे. मुंबई विद्यापीठातील जर्मन विभागाच्या प्रमुख डॉ० विभा सुराणा यांना स्वत: मराठी शिकत असताना अशा प्रकारच्या अध्यापनामध्ये आमूलाग्र बदल होणे अत्यंत निकडीचे आहे हे प्रकर्षाने जाणवले. गेल्या काही दशकांमध्ये युरोपीय भाषांच्या अध्यापनक्षेत्रात सखोल संशोधन होऊन वेगवेगळ्या विचारप्रणाली पुढे आल्या. त्यानुसार भाषाध्यापनाच्या पद्धती, त्यासाठी तयार करावी लागणारी शैक्षणिक सामग्री यांचा जो फेरविचार होतो आहे, त्याचा भारतीय भाषांच्या व सध्यातरी मराठीच्या अध्यापनासाठी उपयोग करून घ्यावा हे उद्दिष्ट डोळ्यांसमोर ठेवून डॉ० सुराणा यांनी 'अन्यभाषकांसाठी मराठी भाषेच्या अध्यापनाचे आधुनिकीकरण' हा प्रकल्प हाती घेतलेला आहे. मुंबई विद्यापीठातील मराठी विभाग, मराठी अभ्यास केंद्र आणि मराठी अभ्यास परिषद यांचेही सहकार्य या प्रकल्पाला लाभलेले आहे.

विद्यापीठ अनुदान आयोगाचा एक भाग म्हणून हा प्रकल्प जर्मन विभागाने मार्च २०१२मध्ये मुंबई विद्यापीठाला सादर केला व ऑगस्ट २०१२मध्ये प्रत्यक्ष कामाला सुरुवातही केली. वैचारिक देवाणघेवाणीसाठी मार्च २०१३मध्ये 'अन्य भाषकांसाठी मराठी : वर्तमानस्वरूप आणि भवितव्य' या विषयावर एक चर्चासत्र आयोजित केले. प्रारंभिक पातळीवरील अभ्यासक्रमाच्या पहिल्या टप्प्यासाठी लागणारी पाठ्यसामग्री जवळजवळ तयार आहे व या सामग्रीवर भाषातज्ज्ञांचेही अभिप्राय मिळावेत, यासाठी १०, ११ व १२

ऑक्टोबर २०१३ असे तीन दिवस मुंबई विद्यापीठात जर्मन विभाग आणि मराठी विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने एका कार्यशाळेचे आयोजन करण्यात आले. पाठ्यसामग्रीवरील तज्ज्ञांची मते विचारात घेऊन त्यात आवश्यक असल्यास सुधारणा करणे हा या कार्यशाळेचा मुख्य हेतू होता.

कार्यशाळेच्या उद्घाटनासाठी महाराष्ट्र राज्याच्या मराठी भाषा सल्लागार समितीचे अध्यक्ष डॉ० नागनाथ कोतापल्ले उपस्थित होते. तीनही दिवस उपस्थित असलेल्यांमध्ये प्र०ना० परांजपे, डॉ० मिलिंद मालशे, डॉ० सोनल कुलकर्णी-जोशी, माधुरी पुरंदरे, डॉ० कलिका मेहता, श्री० सुहास लिमये, श्री० जयवंत चुनेकर, डॉ० दीपक पवार आणि डॉ० अलका मटकर, कृत्तिका भोसले, सोनाली गुजर, गुरुनाथ कलमकर असे भाषावैज्ञानिक व भाषाभ्यासक आणि या पुस्तकातील अभ्यासक्रमातील पाठ व इतर सामग्री तयार करणाऱ्या जर्मन भाषेच्या अभ्यासक श्रीमती गिरिशा सावंत, मानसी सामंत व स्वत: डॉ० विभा सुराणा यांचा समावेश होता.

उद्घाटन-सत्रात मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागाच्या प्रमुख डॉ० पुष्पलता राजापुरे-तापस यांनी सर्व उपस्थित मान्यवरांचे स्वागत केले. जर्मन विभागाच्या प्रमुख आणि या प्रकल्पाच्या सूत्रधार डॉ० विभा सुराणा यांनी या प्रकल्पामागची भूमिका स्पष्ट केली. स्वत:ला मराठी शिकताना आलेल्या अडचणींनीच त्यांना प्रकल्प सुरू करण्याची प्रेरणा दिली.

सर्वच भारतीय भाषांच्या अध्यापनातल्या उणिवा आधुनिक पद्धतींचा व तंत्रज्ञानाचा अवलंब करून भरून काढता येतील आणि जागतिकीकरणामुळे उपलब्ध होणाऱ्या संधींचा फायदा करून घेता येईल अशा विचारांनी प्रेरित होऊन हा प्रकल्प हाती घेण्यात आला; हे त्यांनी सांगितले. त्यांनी हेही नमूद केले की या प्रकल्पामध्ये मुख्य अडचण निधी उभा करण्याची आहे. अंदाजपत्रकानुसार प्रत्येक पातळीसाठी २५ लाख रुपयांप्रमाणे सहा पातळ्यांसाठी दीड कोटी रुपयांहून अधिक अशी भरीव तरतूद करणे आवश्यक आहे. पहिल्या वर्षी प्रसिद्धी, वितरण आदींसाठी अधिक खर्च अपेक्षित आहे. कार्यशाळेचे उद्घाटक डॉ० कोतापल्ले यांनीही मराठी भाषेच्या शास्त्रशुद्ध अध्यापनाची नितांत गरज असल्याचे सांगून मराठी भाषा सल्लागार समिती या प्रकल्पाला निश्चितच सर्वतोपरी मदत करील, असे आश्वासन दिले.

या प्रकल्पाला अगदी सुरुवातीपासूनच सक्रिय पाठिंबा देणारे, 'मराठी अभ्यास परिषदे'चे अध्यक्ष प्र०ना० परांजपे यांनी डॉ० विभा सुराणा यांचे मनापासून अभिनंदन केले. एका अमराठी व्यक्तीला मराठी भाषेविषयी इतकी आत्मीयता असावी आणि अमराठी भाषकांना मराठी यावे म्हणून तिने इतक्या जोमाने व नेटाने प्रयत्न करावेत हे निश्चितच कौतुकास्पद आहे. तसेच श्री० सुहास लिमये आणि श्री० जयवंत चुनेकर यांचाही हा

सर्व अभ्यासक्रम आणि अध्यापनसामग्री तयार करण्यात सिंहाचा वाटा आहे, असेही ते म्हणाले. श्री० सुहास लिमये यांनी या प्रकल्पाचे वेगळेपण विशद केले. उद्घाटन सत्राच्या शेवटी 'मराठी अभ्यास केंद्रा'चे डॉ० दीपक पवार यांनी संबंधितांचे आभार मानले.

चहापानानंतरच्या सत्रात सेबास्टीयान ग्रीज आणि रूपा पुजारी यांनी अनुक्रमे जर्मन आणि मराठी भाषा शिकवण्याचे प्रात्यक्षिक सादर केले. दोन्ही प्रात्यक्षिकांमध्ये एकमेकांचे नाव, देश इ० प्राथमिक माहिती विचारणारे संभाषण होते. अर्ध्या तासातील त्या संभाषणातही त्यांना मराठी शिकण्याची मजा अनुभवता येत होती.

दुपारच्या सत्रापासून तीनही दिवस प्राथमिक स्तरावरील पहिल्या टप्प्यातील दहा प्रकरणे आणि त्यांच्यावरील सरावात्मक स्वाध्याय उपस्थित भाषाध्यापकांसमोर सादर केले गेले व त्यावर तपशीलवार चर्चा करण्यात आली. तयार केलेल्या पाठांमधील प्रत्येक ओळ नजरेखालून घालून भाषातज्ज्ञांनी त्याविषयीची आपली मते सांगितली. शेवटच्या म्हणजेच तिसऱ्या दिवशी भोजनोत्तर सत्रात दहाही प्रकरणांवर एकत्रितपणे अभिप्राय नोंदवले गेले.

या अभ्यासक्रमाच्या लक्ष्यगटात मराठी भाषा शास्त्रशुद्ध आणि संवादात्मक रीतीने शिकण्याची इच्छा असणाऱ्या १२ वर्षांपुढील कोणत्याही भारतीय वा परदेशी अन्यभाषकांचा समावेश असेल. या संपूर्ण अभ्यासक्रमाचे प्रामुख्याने प्राथमिक, माध्यमिक आणि प्रगत असे तीन स्तर असून, प्रत्येक स्तर पुढे दोन टप्प्यांमध्ये म्हणजे एकूण अभ्यासक्रम सहा टप्प्यांमध्ये विभागला गेला आहे. त्यांपैकी प्राथमिक पातळीवरील पहिल्या टप्प्याच्या अभ्यासक्रमाची आखणी व त्यानुसार लिहिलेली पाठ्यपुस्तके व स्वाध्यायपुस्तके (प्रत्येकी सुमारे पुस्तकी २०० पृष्ठसंख्या) जवळजवळ तयार आहेत. प्रत्येक टप्प्यासाठी १२० तास अशी एकूण ७२० तासांची पाठ्यसामग्री तयार करण्याचे आव्हान हा प्रकल्प हाती घेणाऱ्या भाषाध्यापकांपुढे आहे. पाठ्यपुस्तके, स्वाध्यायपुस्तके यांबरोबरच शब्दकोश, अध्यापकांसाठी मार्गदर्शक हस्तपुस्तिका आणि दृक्श्राव्य सामग्री (ऑडिओ व्हिज्युअल सीडी इ०) ही सर्वच अध्यापनसामग्री सहाही पातळ्यांवरील अभ्यासक्रमासाठी तयार करावयाची आहे; पण केवळ एवढीच या प्रकल्पामागची भूमिका नाही. भाषांच्या सर्वसामान्य युरोपीय संदर्भचौकटीत ठरवून दिलेल्या नैपुण्य पातळ्यांप्रमाणे मराठी भाषेच्या अभ्यासक्रमाचे प्रमाणीकरण करणे, हेही या मागचे महत्त्वाचे उद्दिष्ट आहे. यासाठी अध्यापकांनाही प्रशिक्षित करावे लागेल; भाषासंपादनाच्या तंत्राचा विकास करावा लागेल.

युरोपीय देशांमधील आतापर्यंतचा भाषाध्यापन पद्धतींचा इतिहास पाहिला असता, परभाषा शिक्षण म्हणजे अभिजात भाषेतील वाङ्मय वाचता येणे आणि त्यातील व्याकरणाचे विश्लेषण करता येणे या संकल्पनेचा विकास होत होत व्याकरण भाषांतर पद्धती (ग्रामर ट्रान्सलेशन मेथड), श्रवण-भाषण अध्यापन पद्धती (ऑडिओ लिंग्वल मेथड), प्रत्यक्ष भाषाध्यापन पद्धती (डायरेक्ट मेथड), हे महत्त्वाचे टप्पे पार करत आज

ही संकल्पना 'इंटिग्रेटेड कम्युनिकेशन ॲप्रोच'पर्यंत येऊन पोहोचली आहे.

१९६०पर्यंत भाषेच्या संरचनात्मक विचारप्रणालीवर आधारित श्रवण-भाषण अध्यापन पद्धतीला कमालीचे महत्त्व प्राप्त झाले होते. १९७०मध्ये संप्रेषणात्मक किंवा संवादात्मक भाषाध्यापन पद्धतीला अधिक महत्त्व प्राप्त झाले. खरे तर संवादात्मक भाषाध्यापन ही भाषा शिकवण्याची पद्धत नसून ती एक वेगळी विचारप्रणालीच आहे असे मानले जाते. तिलाच व्यावहारिक विचारप्रणाली असेही म्हणतात. आणि तिच्या नावावरूनच भाषाध्यापनाचे उद्दिष्ट लक्षात येते. भाषा हे संवादाचे माध्यम असल्यामुळे ती चारही भाषिक कौशल्यांसह वेगवेगळ्या व्यावहारिक संदर्भांमध्ये वापरता आली पाहिजे व तीही अर्थपूर्ण पद्धतीने, विचारांची देवाणघेवाण करण्यासाठी; हा या पद्धतीमागचा प्रमुख हेतू आहे.

संरचनात्मक विचारप्रणालीतून रूढ झालेल्या श्रवण-भाषण अध्यापन पद्धतीत भाषेतल्या प्रमुख संरचना केंद्रस्थानी ठेवून, त्या संरचनेला लागू होतील असे दैनंदिन वापरातील प्रसंग कल्पून त्याभोवती संवाद गुंफून पाठ तयार केले जातात. संरचनांचा सराव हे भाषा आत्मसात करण्याचे प्रमुख तंत्र असते. भाषा ही एक सवय आहे, हे तत्त्व मानलेले असल्यामुळे चुका न होऊ देण्याकडे कल असतो. आशयापेक्षा संरचनांना, ध्वनींना, शब्दांना अधिक महत्त्व असते. व्याकरणांचे नियम समजावून सांगण्यावर या पद्धतीत अजिबात भर नसतो. वाचन आणि लेखन या कौशल्यांचा विचार भाषण कौशल्यावर थोडेफार प्रभुत्व मिळाल्यानंतर केला जातो. विद्यार्थ्यांच्या मातृभाषेला या पद्धतीत मज्जाव असतो. शिक्षकाचे विद्यार्थ्यांवर पूर्ण नियंत्रण असते. तो आखलेल्या चौकटीबाहेर जाऊ शकत नाही.

याउलट संवादात्मक भाषाध्यापन पद्धतीत आशयाला जास्त महत्त्व असते. संवाद हे व्यवहारातल्या, घरगुती प्रसंगांच्या भोवती रचलेली असतात. ते पाठांतर करून लक्षात ठेवण्याची आवश्यकता नसते. भाषा शिकणे म्हणजे भाषेतल्या संरचना शिकणे नसून प्रसंगानुरूप संवाद साधायला शिकणे गृहीत असते. शिकणाऱ्याचे वय, आवड लक्षात घेऊन त्याला शिकायला मदत होईल असे कोणतेही तंत्र इथे वापरले जाते. या पद्धतीत सुरुवातीपासूनच संवाद साधायला उत्तेजन दिले जाते. विद्यार्थ्यांच्या मातृभाषेचा उपयोग थोडाफार करायला काहीच हरकत नसते. वाचन आणि लेखनाला पहिल्या दिवसापासूनच सुरुवात करता येते. संवाद साधताना विद्यार्थ्यांच्या चुका झाल्या तरी तिकडे दुर्लक्ष केले जाते. दैनंदिन व्यवहारात उपयोगी पडणे हा भाषावापराचा हेतू असल्याने तेवढ्यापुरतेच व्याकरण शिकवले जाते.

१९७६मध्ये विल्किन्स या भाषावैज्ञानिकाने कोणकोणत्या व्यवहारक्षेत्रांमध्ये परभाषा बोलणे अटळ असते त्याची एक यादीच सांगितली होती. उदा० प्रवास, उद्योगधंदा, खरेदी, शिक्षण, स्वत:ची ओळख, विनंती, एखाद्या गोष्टीचे वा वस्तूचे वर्णन, वेळ, कालावधी

इत्यादी एक प्रकारे ही परभाषा शिकण्याची उद्दिष्टेच होती.

जर्मन विभागाने कार्यशाळेत जे दहा पाठ अभ्यासकांसमोर सादर केले त्यांचे विषयही विद्यार्थ्यांची संवाद साधण्याची गरज पूर्ण होईल असेच आहेत. ओळख - त्यामध्ये स्वत:चे नाव, व्यवसाय, ठिकाण, आवडता रंग, मातृभाषा, राष्ट्रीयत्व, छंद, एकमेकांचा दिनक्रम, खुशाली इ० गोष्टींबद्दल सांगणारे-विचारणारे पाठ त्यात आहेत. त्याचबरोबर हॉटेलात जाणे, ऑर्डर देणे, खरेदीला जाणे, वस्तूंच्या किमती विचारणे, सांगणे, परवानगी विचारणे-देणे, आवडता सण, वाढदिवस सांगणे, त्यासाठी आमंत्रण करणे, आभार मानणे, सल्ला/मदत मागणे इ० भाषेची कार्ये लक्षात घेऊन विषयानुरूप संवादकौशल्य शिकवण्यासाठी हे पाठ तयार केलेले आहेत.

प्राथमिक पातळीवरचे दोन्ही टप्पे पार पाडल्यानंतर विद्यार्थी वरील विषयांवर संवाद करू शकेल. त्याला लिपी आणि सोप्या, लहान वाक्यरचना अवगत झालेल्या असतील.

प्रत्येक पाठ तयार करताना संवादकौशल्ये, सराव, व्याकरण, शब्दसंपदा, कृतीतून व खेळातून शिक्षण, दृक्-श्राव्य साधनांचा वापर, दृष्टिक्षेप, चाचणी, स्वमूल्यमापन, शब्दकोश आणि स्वाध्यायांची उत्तरे या गोष्टीकडे लक्ष दिले आहे.

पाठ्यपुस्तकांबरोबरच जे स्वाध्याय-सराव पुस्तक तयार केले आहे. त्यातील स्वाध्याय आधी सोपे नंतर अवघड अशा क्रमाने दिले आहेत. तसेच ते पाठाच्या विषयाशी सुसंगत आहेत. स्वाध्यायांमध्ये रिकाम्या जागा भरा, जोड्या जुळवा किंवा कंसात दिलेल्या शब्दाच्या साहाय्याने प्रश्नाचे उत्तर द्या इ० रूढ प्रकारही आहेत. आणि काही नावीन्यपूर्ण स्वाध्यायही आहेत. उदा० चवींबद्दलच्या व रंगांबद्दलच्या पाठात रिकाम्या जागी चवी वा रंगांची नावे भरण्याचे स्वाध्याय विद्यार्थ्यांच्या विचारशक्तीला चालना देणारे आहेत. दृक्-श्राव्य साधनांतर्गत त्यांनी टीव्हीवरील काही जाहिरातींचा वापर अत्यंत कल्पकतेने केला आहे. उदा० मोती साबणाची जाहिरात - भाषा आणि संस्कृती या दोन्ही गोष्टींचा सुंदर मिलाफ या जाहिरातीत आहे. एअरटेलच्या जाहिरातीची निवडही अशीच योग्य आहे. मराठीतील शब्दयोगी अव्यये शिकवण्यासाठी फिल्म्स डिव्हिजनच्या लघुचित्रपटाचाही चांगला उपयोग झाला आहे.

कार्यशाळेत उद्‌घाटन सत्रानंतरच्या प्रत्येक सत्रात जी प्रात्यक्षिके किंवा पाठ अभ्यासकांसमोर सादर केले गेले, त्या प्रत्येकावर पाठांचा आशय आणि सादर करण्याची पद्धत या दोन्ही दृष्टींनी त्रुटींवर सविस्तर चर्चा झाली. उदा० प्रात्यक्षिक म्हणून सादर केल्या गेलेल्या पाठात 'आपण' या सर्वनामाचा वापर थोडा खटकला. आपण व तुम्ही ही सर्वनामे जरी द्वितीयपुरुषवाचक असली तरी अलीकडच्या सामाजिक संकेतांनुसार अतिमहत्त्वाच्या व्यक्तींशी बोलतानाच 'आपण' वापरले जाते. इतर प्रसंगी 'तुम्ही' या सर्वनामातूनही पुरेसा आदर व्यक्त होतो. 'आपण'च्या वापरामुळे तो संवाद अधिक

औपचारिक होण्याची शक्यता असते. 'उत्तम' या अभिप्रायापेक्षा 'छान', 'चांगला' हा अभिप्राय बोली भाषेत अधिक दिला जातो. 'त' आणि 'मध्ये' या प्रत्यय-अव्ययांपैकी बोलताना सहसा सोयीसाठी अनेकवचनी नामांबरोबर 'मध्ये' वापरले जाते. आपला देश कुठला? या प्रश्नातील 'कुठला' हे प्रश्नवाचक काही लोकांच्या तोंडी असले तरी प्रमाणभाषेनुसार 'कोणता' हे प्रश्नवाचक वापरणेच योग्य आहे, या व अशा इतर काही मुद्द्यांवर सर्व सत्रांमध्ये चर्चा झाली व सुधारणा सुचविण्यात आल्या. चर्चेचा मुद्दा हाच होता की या पद्धतीचा मूळ गाभा संवाद हाच असल्यामुळे संवादाची, संभाषणाची भाषा अकृत्रिम हवी, बोलीला जवळची हवी.

भाषाध्यापक माधुरी पुरंदरे यांनीही काही सुधारणा सुचवल्या. या प्रकल्पाला 'माय मराठी' असे अनेकदा वेगवेगळ्या संदर्भात वापरले गेलेले नाव न देता दुसरे एखादे सूचक नाव असावे, तसेच संवादात्मक भाषाध्यापन पद्धतीचा वापर तिच्या सर्व शक्तींनिशी करावा, तयार केलेल्या सर्व संवाद-पाठांचा पुन्हा एकदा आढावा घ्यावा, तयार केलेले स्वाध्यायपुस्तक स्वत: तसेच इतरांकडूनही एकदा सोडवून पाहावे, काही वाक्ये सुटी वापरली जात नाहीत; ती विशिष्ट संदर्भातच येतात. पाठांना कोणत्याही एका विशिष्ट वर्गाचा सामाजिक संदर्भ नसावा. व्यापक अशा सामाजिक आर्थिक स्तराशी संबंधित गटानुसार सण, नावे, आडनावे, इ०ची निवड करावी; अमराठी भाषकांच्या संस्कृतीचेही भान राखले जावे, स्वाध्याय, त्यांचे उपविभाग या सर्वांना क्रमांक देताना एक शिस्त असावी, स्वाध्यायांच्या सूचना देणाऱ्या भाषेत एकवाक्यता असावी अशा वरकरणी छोट्या वाटणाऱ्या परंतु अत्यंत मौलिक सूचना त्यांनी केल्या. ही पाठ्यपुस्तके वापरताना उपयोगी पडू शकेल असा शब्दकोश तयार करण्यात यावा, गणित विषय शिकवताना जसा उदाहरणांचा, त्यांच्या उत्तरांचा एक वेगळा संग्रह दिला जातो तसा या पाठांना पूरक अशा स्वाध्यायांचा व त्याच्या उत्तरांचाही संग्रह दिला जावा, दृक्-श्राव्य साधन म्हणून जाहिरातीचीही निवड करताना इंग्रजी/ हिंदी वरून बेतलेल्या मराठी जाहिराती टाळाव्यात. अशाही काही सूचना अभ्यासकांकडून आल्या. अर्थात या सर्व सूचना ही पाठ्यपुस्तके व स्वाध्यायपुस्तके निर्दोष व अधिक विद्यार्थीकेंद्री होण्यासाठीच होत्या.

सर्वानुमते हा प्रकल्प अत्यंत आवश्यक असून ही पाठ्यपुस्तके परदेशी व परप्रांतीय, विशेषत: मुंबई-पुण्यासारख्या शहरात उपजीविकेसाठी येणाऱ्या अनेक व्यावसायिकांनाही उपयुक्त ठरू शकतील अशी आहेत.

या प्रकल्पासाठी आम्हां सर्व मराठी भाषाप्रेमींतर्फे मन:पूर्वक शुभेच्छा! ■





अनुक्रमणिका

# आधुनिक मराठीची अभिजात अवहेलना

**प्रकाश परब**

मराठी भाषेला केंद्र शासनाकडून अभिजात भाषेचा दर्जा मिळावा म्हणून महाराष्ट्र शासन प्रयत्नशील आहे. शासनाचे हे प्रयत्न म्हणजे मराठी भाषेच्या विकासासाठी उचललेले एक दमदार पाऊल आहे अशी ठळक प्रसिद्धीही त्याला मिळत आहे. प्रा० रंगनाथ पठारे ह्यांच्या अध्यक्षतेखालील समितीने आवश्यक ती पूर्तता करून अलीकडेच तसा प्रस्ताव संबंधित खात्याला पाठवल्याचे कळते. आता हा मराठी भाषेला सन्मान प्राप्त करून देणारा व तिच्या विकासाची दारे खुली करणारा बहुचर्चित किताब कधी मिळतो ते पाहायचे. जणू वर्तमान, आधुनिक मराठीचे भवितव्य ह्या किताबावर अवलंबून असल्याने मराठी भाषाविकासाच्या आघाडीवर सध्या सर्वत्र सामसूम आहे. अनेक वर्षे संचालकच नसल्यामुळे राज्य मराठी विकास संस्था आपले भाषानियोजनाचे काम सोडून सुचेल ते काम करीत आहे, किंवा आपली घटका कधी भरते ह्या भीतीखाली काही तरी केल्यासारखे दाखवते आहे. मध्यंतरी 'राज्य मराठी विकास संस्था' आणि 'साहित्य संस्कृती मंडळ' ह्या दोन्ही संस्था एकाच प्रकारचे काम करतात म्हणून त्यांचे विलीनीकरण करण्याचा शोध कोणी तरी लावला. राज्य सरकारने पडत्या फळाची आज्ञा मानून त्याबाबतचा निर्णय विनाविलंब घेता यावा म्हणून एक समितीही स्थापन केली. भाषाविकासाच्या अस्तित्वात असलेल्या संस्था बंद करण्यात किंवा त्या मरणासन्न स्थितीत ठेवण्यात आपल्याला कोणी प्रतिस्पर्धी नाही. मग ते 'विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ' असो की 'राज्य मराठी विकास संस्था.' मराठी भाषाविकासासाठी 'निविदा' वगैरे काही निघत नसल्यामुळे राज्यकर्त्यांनाही ह्या 'भाकड' उद्योगात रस नाही. दोन वर्षांपूर्वी मंत्रालयात स्थापन झालेल्या मराठी भाषा विभागापुढे सध्या तरी अभिजात भाषेचा दर्जा प्राप्त करणे हे एकमेव लक्ष्य आहे.

## अभिजाततेचे मृगजळ

केंद्र शासनाने २००४ सालापासून, भारतीय भाषांसाठी विशेष अनुदान व सवलतींसह अभिजात भाषेचा दर्जा देण्याची घोषणा केली. त्यासाठी पुरातन वाङ्मय, दीड ते दोन हजार वर्षांपेक्षा दीर्घ, स्वतंत्र व मौलिक वाङ्मयीन परंपरा आदी निकष ठरवण्यात आले. आतापर्यंत, तमीळ (२००४), संस्कृत (२००५), कन्नड, तेलगू (२००८) आणि मल्याळम (२०१३) या भाषांना अभिजात भाषेता दर्जा प्राप्त झाला आहे. बंगाली,





अनुक्रमणिका

ओडिया, मराठी या भाषांचे प्रस्ताव केंद्र शासनाकडे प्रलंबित असून अभिजात भाषेचा दर्जा मिळवा म्हणून त्या त्या राज्यातील राजकीय दबावगट कार्यरत आहेत. आपली भाषा पुरातन. स्वतंत्र व मौलिक वाङ्मयीन परंपरा असलेली आहे किंवा नाही ह्यापेक्षा आपल्या शेजारच्या राज्यातील भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळतो मग आपल्याला का नाही अशा ईर्षेतून अभिजात भाषेसाठी मोहिमा राबवल्या जात आहे. आता हा मुद्दा भाषिक, वाङ्मयीन, सांस्कृतिक राहिलेला नसून निव्वळ राजकीय बनलेला आहे. भविष्यात, केंद्र शासनाला ही योजना एकतर गुंडाळावी लागेल किंवा राज्यघटनेच्या आठव्या परिशिष्टातील सर्व भारतीय भाषांना त्या अभिजात भाषा असल्याचे घोषित करावे लागेल. अभिजाततेचा संबंध भाषेच्या पुरातन, अप्रचलित, खंडित वाङ्मयीन भाषिक रूपांशी आहे. पर राज्यकर्त्यांसाठी तो मतांचा, अस्मितेचा, शक्तिप्रदर्शनाचा मुद्दा आहे. विचारी लोकही ह्या मृगजळामागे धावतात याचे आश्चर्य वाटते.

केंद्र शासनाकडून अभिजात भाषांना मिळणारे जे आर्थिक लाभ आहेत ते प्रामुख्याने संबंधित भाषेचा पुरातन वारसा जतन करण्यासाठी, त्याच्या संशोधनात्मक अभ्यासाकरिता संस्थात्मक यंत्रणा उभारण्यासाठी आहेत. त्यांचा भारतीय भाषांच्या वर्तमान स्थितिगतीशी काही संबंध नाही. पण भाषेकडे केवळ अस्मितेच्या अंगाने पाहणाऱ्यांना आणि 'भाषाविकास' म्हणजे नक्की काय ह्याबाबत अनभिज्ञ असणाऱ्यांना राजकीय ताकद पणाला लावून असा एखादा किताब फुकटात मिळत असेल तर तो पदरात पाडून घ्यावयाचा आहे. मुळात ज्या हेतूने भारतीय भाषांना हा दर्जा दिला जाणार आहे तो हेतू साध्य करायला या राज्यांना कोणी रोखले आहे? विद्यापीठ स्तरावर किंवा स्वतंत्र भाषाविद्यापीठ स्थापन करून जे काम करता येणे शक्य आहे ते करण्यासाठी केंद्र शासनाकडून असा दर्जा मिळेपर्यंत वाट कशाला पाहायला हवी? राज्यांकडे शे-दोनशे कोटी रुपये नाहीत म्हणून हे काम अडले आहे काय? समजा अनेक खटपटी, लटपटी करून केंद्र शासनाकडून आपण मराठी भाषेसाठी अभिजात भाषेचा दर्जा प्राप्त केलाच तर त्यामुळे काय साध्य होणार आहे, की जे आजघडीला केवळ अशक्य आहे? ज्या भाषांना हा किताब मिळावा त्यांच्या स्थितीत काही फरक पडल्याचे ऐकिवात नाही. उलट केंद्राकडून निधी मिळवण्यात येणाऱ्या अडचणींचीच चर्चा आहे. अभिजात भाषेचा दर्जा प्राप्त झालेल्या संस्कृत, तमीळ भाषांव्यतिरिक्त अन्य भाषांच्या अभिजात असण्याविषयी शंकाही घेतल्या जात आहेत. मल्याळम भाषेला अभिजात भाषा म्हणून गौरवणे हा मूर्खपणा असल्याचे त्याच भाषेच्या काही अभ्यासकांना वाटते हेही लक्षात घेण्यासारखे आहे. सर्वांत महत्त्वाचा मुद्दा म्हणजे, सर्वच भारतीय भाषांची वर्तमान स्थिती इंग्लिशच्या तुलनेत अतिशय दारुण असताना अभिजात भारतीय भाषांनाही पुरातन वारसा ठरवून इतिहासजमा करायचे आहे काय? इंग्लिश ही अभिजात भाषा नाही व तसा तिचा दावाही नाही. पण ती वर्तमानाची आणि

भविष्याची भाषा आहे. अशी आकांक्षा भारतीय भाषांनी का बाळगू नये? त्यांचा अभिजाततेचा सोस हा त्यांच्या पराभूत मानसिकतेतून तर आलेला नाही ना? आपली भाषा पुरातन असण्यावर राजकीय शिक्कामोर्तब झाल्याने एका समृद्ध वारसा असणाऱ्या भाषेची आधुनिक काळात वाताहत करणारा भाषिक समाज म्हणून आपली बेअब्रू होत नाही काय? हा सगळा प्रकार 'रोम जळत होते, तेव्हा निरो फिडेल वाजवत होता' ह्या थाटाचा आहे. भारतीय भाषांच्या संवर्धनासाठी ज्या बाबी तातडीने करायच्या आहेत त्यांच्या यादीत त्यांना अभिजात भाषा म्हणून गौरवणे ही बाब शेवटची किंवा फार तर शेवटून दुसरी असू शकेल. भारतीय भाषांबाबत काही करण्याचे आपले अग्रक्रम काय आहेत हे ठरवण्यासाठी वेळ आली आहे.

**जगभरचे भाषिक वास्तव**

केवळ भारतीयच नव्हे; तर जागतिक स्तरावरही भाषांच्या अस्तित्वाचा प्रश्न गंभीर बनला आहे. जागतिकीकरणाच्या ह्या काळात जगाचा भाषिक नकाशाच बदलत आहे. भाषिक-सांस्कृतिक बहुविधतेला हादरे बसत आहेत. आपापल्या पारंपरिक भाषांचा त्याग करून किंवा त्यांची अपेक्षा करून वैश्विक संधी प्राप्त करून देणाऱ्या प्रबळ भाषेकडे लोक वळत आहेत. केवळ विकसनशील, बहुभाषक देशांमध्येच हे घडते आहे असे नसून एकभाषक, प्रगत देशांनाही ह्याची लागण झाली आहे. चीन, जपानसारख्या देशांतही इंग्लिश भाषेला महत्त्व मिळते आहे. आंतरराष्ट्रीय बाजारपेठ, देशांतर्गत परकीय गुंतवणूक, बहुराष्ट्रीय कंपन्यांचे आगमन, महाजाल यांमुळे इंग्लिश भाषेचे महत्त्व कधी नव्हे इतके वाढू लागले आहे. चीन, जपानमध्ये इंग्लिश माध्यमातून शिक्षण घेणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. परदेशी विद्यार्थ्यांना आकर्षित करण्यासाठी स्थानिक भाषांबाबतचे धोरण बदलले जात आहे. जर्मनीला आपली सॉफ्टवेअर क्षेत्रातील देशांतर्गत मक्तेदारी टिकवण्यासाठी इंग्लिशबाबतचे धोरण मवाळ करावे लागत आहे. फ्रान्सने इंग्लिशच्या वाढत्या प्रभुत्वाची नोंद घेऊन आपला फ्रेंच भाषेचा गड सांभाळण्यासाठी भाषिक यंत्रणा प्रस्थापित केली आहे. बहुभाषकतेचे धोरण स्वीकारणाऱ्या युरोपीय समूहाला सदस्य राष्ट्रांमधील इंग्लिशेतर भाषांविषयी चिंता वाटते आहे. बोस्नियातील मानवी हक्कांचे लोकपाल काय म्हणतात पाहा, ''No-one pays attention to what you say unless you speak English, because English is the language of power." ('English-Only Europe?; Challenging Language Policy' (2003)-Robert Phillipson)

गेल्या पाचशे वर्षांत जगातील सुमारे अर्ध्याहून अधिक ज्ञातभाषा विनावापरामुळे मृत पावल्या आणि शिल्लक राहिलेल्या भाषांपैकी अर्ध्याहून अधिक भाषा ह्या शतकाखेरपर्यंत नाहीशा होतील, असे सांगितले जाते. विशेष म्हणजे, ज्या भाषा टिकून राहातील

त्यांच्यापैकी फारच थोड्या सुरक्षित असतील. मायकेल क्रॉस यांच्या मते तर एकविसावे शतक संपेल तेव्हा पृथ्वीवर केवळ ६०० भाषा शिल्लक असतील. म्हणजे, सुमारे ९० टक्के भाषा आपण गमावलेल्या असतील. भाषेच्या जगण्यामरण्यापेक्षा लोकांना स्वत:च्या भवितव्याची चिंता अधिक असल्यामुळे जगाचे सांस्कृतिक वैभव असलेल्या शेकडो भाषा नामशेष होण्याच्या मार्गावर आहेत. दर १४ मिनिटांना एक भाषा जगाचा निरोप घेत आहे. त्यामुळे हा भाषासंहार थांबवायचा कसा, हा एक वैश्विक चिंतेचा प्रश्न बनला आहे.

जागतिकीकरणामुळे जगाची वाटचाल भाषिक विकेंद्रीकरणाकडून भाषिक ध्रुवीकरणाकडे सुरू झाली आहे, यात काहीच शंका नाही. जगाचे एकच एक प्रशासन किंवा विश्वराज्य कधी येईल तेव्हा येईल पण आज सर्वांना जोडणाऱ्या विश्वभाषेची चर्चा सुरू झाली आहे एवढे मात्र नक्की. इंग्लिश ही जागतिक संपर्कभाषेची किंवा विश्वभाषेची पहिल्या क्रमांकाची दावेदार असून त्या दिशेने तिची घोडदौड सुरू आहे. डेव्हिड क्रिस्टल ह्यांनी इंग्लिश भाषेच्या ह्या वैश्विक वाढीची जी दोन प्रमुख कारणे सांगितली आहेत ती म्हणजे सोळाव्या शतकापासूनचा इंग्लंडचा साम्राज्यविस्तार आणि विसाव्या शतकात अमेरिकेचा आर्थिक महासत्ता म्हणून झालेला उदय. ज्ञानभाषा म्हणून इंग्लिशने फ्रेंच, जर्मन या भाषांना मागे टाकले असून अडीच लाखांहून अधिक इतका प्रचंड शब्दसाठा तिच्याकडे आहे. वाढत्या उपयुक्ततेमुळे तिच्या परभाषकांची संख्या तिच्या निजभाषकांच्या जवळपास तिप्पट झाली आहे. भारत आणि चीनमधील तिच्या वाढत्या वापरामुळे तिची संख्यात्मक वाढ कुठल्या कुठे गेली आहे. इंग्लिशमध्ये अधिक प्रवीण कोण अशी जणू स्पर्धाच भारत आणि चीन या देशांत लागली आहे. भारतात सुमारे १२ टक्के लोक इंग्लिशचा वापर करत असले तरी चीन ज्या वेगाने ह्या भाषेचे धडे आज गिरवतो आहे ते पाहता चीन लवकरच भारताला मागे टाकेल असा एक अंदाज आहे. मात्र आज तरी इंग्लिश भाषा सर्वाधिक वापरणाऱ्या देशांमध्ये इंग्लंड, अमेरिका यांच्यानंतर भारताचा क्रमांक लागतो.

**भाषिक प्रश्नांविषयी अनास्था, तटस्थता व तुच्छता**

एकीकडे एकभाषक, प्रगत देश आपापल्या पारंपरिक भाषा सांभाळण्यासाठी, इंग्लिशचे वर्चस्व रोखण्यासाठी - किमान नियंत्रणात ठेवण्यासाठी युद्धपातळीवर काम करताहेत तर भारतीय लोक आपल्या भाषांच्या वर्तमानाकडे डोळेझाक करून त्यांच्या भूतकालीन वैभवात समाधान मानताहेत. ज्यांना ह्या प्रश्नांची जाण आहे असे भाषाभ्यासक एक तर हताश आहेत किंवा भाषातटस्थ आहेत. भारतीय भाषांच्या संवर्धनासाठी काही कृती करणे तर सोडाच पण काही भूमिका घेणेही ते टाळतात. भाषाचळवळींकडे तुच्छतेने पाहतात. जणू व्यवहारात भारतीय भाषांचा आग्रह धरला तर आपण संकुचित, प्रतिगामी ठरू किंवा आपली तज्ज्ञता बाधित होईल. त्यांना भाषेच्या वर्तमान सामाजिक, व्यावहारिक,

आर्थिक अशा कृष्ण-धवल प्रश्नांपेक्षा बौद्धिक, व्यामिश्र व चिरंतन प्रश्नांच्या चिकित्सेत अधिक रस आहे. आपल्या भाषा जगल्या काय आणि मेल्या काय, काही फरक पडत नाही. त्यांच्या जिवंत किंवा मृत अवशेषांची चर्चा-चिकित्सा महत्त्वाची! बुडणाऱ्या मनुष्याला वाचवण्यापेक्षा त्याच्या टोपीच्या लांबीरुंदीची, सौंदर्याची अमूर्त चर्चाचिकित्सा करणारा एक वर्ग जसा अन्य क्षेत्रांत आहे तसा तो भाषेच्या क्षेत्रातही आहे. व्यासंगी अभ्यासक, तज्ज्ञ व्यक्ती जेव्हा व्यावहारिक पातळीवर कृतिशून्य राहाणे पसंत करतात तेव्हा ती पोकळी भरून काढण्यासाठी अपात्र लोक पुढे येतात. तसे ते भाषेच्या क्षेत्रातही आहेत. परिणामी ह्या क्षेत्रात अनेक समज-गैरसमज, श्रद्धा-अंधश्रद्धा आहेत. राजकारणाप्रमाणे भाषाकारणही भाषा व भाषाव्यवहाराची शास्त्रीय जाण आणि वकूब नसलेल्या लोकांसाठी खुले आहे. त्यामुळे भाषेबद्दल एक भ्रममूलक वातावरण आणि व्यक्तिगत व सामाजिक स्तरांवर अनेक प्रकारचे गंड निर्माण झालेले दिसतात.

सर्वसामान्य भाषकांमध्ये भाषेच्या व्यावहारिक प्रश्नांविषयी अनास्था, अभ्यासकांमध्ये तटस्थता तर काही लोकप्रतिनिधींमध्ये तुच्छता आढळून येते. मध्यंतरी एका प्रमुख राष्ट्रीय पक्षाच्या नेत्याने महाराष्ट्रात येऊन प्रादेशिक, मराठीवादी पक्षांना लक्ष्य करीत आपल्याला सर्व भाषा 'समान' असल्याचे सांगितले. हे विधान भाषावैज्ञानिक स्वरूपाचे नक्कीच नव्हते. प्रादेशिक पक्षांनी स्थानिक भाषांचा आग्रह धरून भाषेचे राजकारण करू नये असे त्यांना सुचवायचे होते. प्रत्यक्षात भारतीय राज्यघटना इंग्लिश व हिंदी भाषांच्या वापराबाबत विशेष तरतुदी करून अन्य भारतीय भाषांचे त्या त्या प्रांतातील विशेष स्थान अधोरेखित करते. पण जाती, धर्म आणि भाषा यांना एका रांगेत बसवून काही राजकारणी प्रांतीय भाषेचा आग्रह धरणाऱ्यांना गुन्हेगार ठरवतात. अशाने देशाचे बाल्कनायझेशन होईल असे त्यांचे म्हणणे. परकीय भाषा असूनही इंग्लिश भाषेचा सार्वत्रिक अवलंब म्हणजे राष्ट्रीय एकात्मता व शेकडो वर्षांची देशी परंपरा असणाऱ्या भारतीय भाषा म्हणजे फुटिरतेला निमंत्रण! असला अडाणीपणा महाराष्ट्रातही स्वतःला पुरोगामी व राष्ट्रवादी समजणाऱ्या काही नेत्यांमध्ये आढळतो. म्हणे, शाहू, फुले, आंबेडकरांच्या महाराष्ट्रात प्रादेशिक भाषावादाला स्थान नाही. एका बाजूला भाषिक दुरभिमान आणि दुसऱ्या बाजूला भाषिक अपराधगंड याच्या कात्रीत भारतीय भाषा सापडल्या आहेत.

### साहित्यिकांचे भाषाभ्रम

राजकारण्यांना बाजूला ठेवून साहित्यिकांच्या भाषाजाणिवा तपासल्या तर तिथेही अंधार आहे. 'भाषेचा विकास म्हणजे साहित्याचा विकास' हा समज आपल्याकडे इतका दृढमूल आहे की मराठी भाषेचे भवितव्य जणू मराठी साहित्यिकांच्याच हातात आहे, असे मानले जाते. भाषेचा कोणताही प्रश्न असो तो साहित्यिकांकडे सोपवला जातो. भाषाविकासविषयक संस्थांची धुराही ज्येष्ठ साहित्यिकांच्या हाती सोपवली जाते. राज्याचे

'भाषा सल्लागार मंडळ' असो की 'राज्य मराठी विकास संस्था' सर्वत्र साहित्यिकांचीच मक्तेदारी. साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावरून आपले राज्यकर्ते साहित्यिकांना मराठी भाषेच्या विकासाचे आवाहन करतात आणि मग साहित्यिकांनाही वाटते की हे आपलेच काम आहे. काही साहित्यिक तर मराठीच्या विकासाबाबत इतके आत्मसंतुष्ट आहेत की मराठी भाषेपुढे काही गंभीर प्रश्न आहेत आणि ते युद्धपातळीवर सोडवण्याची आवश्यकता आहे असे त्यांना वाटत नाही.

काही वर्षांपूर्वी एका ज्येष्ठ मराठी साहित्यिकाने मराठी भाषेच्या अस्तित्वाबाबत चिंता करण्याचे काही कारण नाही, मराठी भाषेला काही झालेले नाही आणि सूर्य, चंद्र असेपर्यंत काही होणारही नाही असे वक्तव्य केल्याचे स्मरते. साहित्य संमेलनातील एका परिसंवादात एका प्रथितयश कादंबरीकाराने मंडपातील समोरच्या गर्दीचा दाखला देत मराठी भाषेच्या नावाने 'गळा काढणारांना' ही सणसणीत चपराक असल्याचे उद्‌गार काढून टाळ्या मिळवल्या होत्या. एका ज्येष्ठ कवीने तर, मराठी भाषेचे भवितव्य सुरक्षित आहे, तिची चिंता करण्याचे कारण नाही यासाठी काय दाखला द्यावा? म्हणे, आपण जिथे जिथे काव्यवाचनासाठी जातो तिथे तिथे श्रोत्यांचा चांगला प्रतिसाद मिळतो. इतकेच नव्हे, तर आपल्या कवितेला जिथे दाद द्यायची तिथेच ती मिळते. आता काय म्हणाले ह्याला!

मराठी भाषेला काही तरी झालेले आहे असे शहरांतील लोकांना विनाकारण वाटते. खेड्यापाड्यांतील लोक आजही मराठीतूनच व्यवहार करतात. जोपर्यंत खेडी आहेत तोपर्यंत मराठीच्या भवितव्याची काळजी करण्याचे कारण नाही. असे प्रतिपादन करणाराही एक वर्ग आहे. साडेअकरा कोटींच्या महाराष्ट्रात मराठी भाषेची पीछेहाट होईलं यावर त्यांचा विश्वास नाही. ज्या भाषेत ज्ञानेश्वर, तुकाराम यांच्यासारखे महान कवी होऊन गेले त्या भाषेचे वाईट कसे होईल? सासवड येथील अ०भा० मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष एका मुलाखतीत काय म्हणाले पाहा - 'जोवर कीर्तनं रंगतायत, भजनं घुमतायेत, वारकरी आहेत तोवर तरी मराठीची काळजी करावी, असं मला अजिबात वाटत नाही. इंग्रजी माध्यमाच्या शाळांचाही उगाच बाऊ करण्यात अर्थ नाही. आजच्या काळात इंग्रजीची उत्तम जाण हवीच. आणि शाळा इंग्रजी असली तरी घरी मराठीचे संस्कार करता येतातच की, त्यात काय अडचण आहे? त्यामुळे मराठीचे भवितव्य उत्तम आहे. त्याबाबत चिंता नसावी.' (म०टा० २७/१०/२०१३)

'भाषाविकासा'बाबत आपल्या साहित्यिकांचे आकलन असे असेल तर सर्वसामान्य लोकांबाबत बोलायलाच नको. भाषाविकासाबाबतच्या चुकीच्या धारणांतून व साहित्यव्यवहारावरील श्रद्धेतून अशी विधाने केली जात असली तरी त्यामुळे मराठीचे अपरिमित नुकसान होते हे लक्षात घेतले पाहिजे. एखादी व्यक्ती खरेच आजारी असताना तिच्यावर उपचार करण्याऐवजी तिला काहीच झालेले नाही असे वारंवार सांगून आपण

तिला मृत्यूच्या अधिक जवळ नेत असतो. मराठीचे आलबेल चालले आहे असा धादान्त गैरसमज पसरवून मराठीसाठी शिक्षण, प्रशासन, तंत्रज्ञान आदी क्षेत्रांत जे काही थोडेफार प्रयत्न काही व्यक्ती व स्वयंसेवी संस्था करीत आहेत त्यांचेही पाय ओढत आहोत.

खेडोपाडी लोक मराठीच बोलतात, गावोगावी काव्यवाचनाचे कार्यक्रम होतात किंवा छोटी छोटी साहित्य संमेलनेही होतात, हा काही मराठीच्या विकासाचा पुरावा नाही. 'भाषा-विकास' म्हणजे नक्की काय हे समजून घेऊन वर्तमानात कृती केली नाही तर ज्ञानेश्वर, तुकारामही मराठीला वाचवू शकणार नाहीत. 'पूर्वदिव्य ज्यांचे त्यांना रम्य भावि काळ' ह्या काव्यपंक्ती आळवून आपले समाधान अवश्य करून घेता येईल पण त्याने भाषेचा विकास होणार नाही. इतिहासाचार्य राजवाडे, कविवर्य कुसुमाग्रज आदींनी मराठी भाषेच्या वास्तव स्थितीची कल्पना देऊन मराठी समाजाला जाग आणण्याचा प्रयत्न केला. पण आपण वास्तवाकडे दुर्लक्ष करून मराठीचे छान चालले आहे' अशा भ्रमात राहाणेच पसंत केले. अभिजात भाषादर्जाच्या खोट्या प्रतिष्ठेमागे लागून हा भ्रम अधिक घट्ट होणार आहे.

**'भाषाविकासा'ची संकल्पना**

भाषासंवर्धन ही निरंतन चालणारी प्रक्रिया असून तीत शासन आणि जनता या दोहोंचाही समन्वयपूर्ण सहभाग आवश्यक असतो. अर्थात, 'विकास' म्हणजे नक्की काय ह्या विषयीची आपली धारणा पक्की असायला हवी. 'भाषेचा विकास' ही संकल्पना मनोभाषाविज्ञानात भाषा-संपादन किंवा भाषा आत्मसात करण्याची प्रक्रिया ह्या अर्थाने येते तर समाजभाषाविज्ञानात विशिष्ट भाषेची वापरसापेक्ष वाढ किंवा प्रगती व तिचे समाजातील स्थान ह्या अर्थाने प्रचलित आहे. त्यासाठी भाषावैज्ञानिकांनी भाषेच्या विकासाचे काही निकष, मापदंड सांगितलेले आहेत. विशेष म्हणजे, मराठी भाषेच्या विकासासंदर्भात ज्या साहित्यव्यवहाराचा आपल्याकडे पदोपदी उल्लेख होतो त्याचा या मापदंडांत अजिबात समावेश नाही.

'भाषाविकासा'चे निकष किंवा मापदंड स्थूलमानाने असे आहेत -

(१) स्वतःचा भूप्रदेश असणे. (२) संबंधित भाषकांचे एकूण लोकसंख्येतील प्रमाण. (३) भाषेच्या वापरक्षेत्रांची व्याप्ती व गुणवत्ता. (४) संबंधित भाषकांच्या भाषिक क्षमतेची पातळी. (५) संबंधित भाषकांचा स्वभाषेकडे पाहण्याचा दृष्टिकोण. (५) अधिकृत स्थान व शासकीय भाषाधोरण. (६) एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे भाषेचे संक्रमण. (७) भाषाशिक्षणाच्या साधनासामग्रीची उपलब्धता. (८) आधुनिक व नवनवीन वापरक्षेत्रांना, माध्यमांना व तंत्रज्ञानाला प्रतिसाद. (९) भाषेच्या प्रमाणीकरणाचे स्वरूप व अनुसरण (१०) संबंधित भाषकांची क्रयशक्ती किंवा सांपत्तिक स्थिती इ०

केवळ संख्याबळ व समृद्ध साहित्यपरंपरा हे निकष लावून मराठीचे बरे चालले आहे. असे समाधान मानणाऱ्यांनी वरील निकषांच्या आधारे मराठीच्या विकासाचा निर्देशांक काढण्याची गरज आहे. वरीलपैकी पहिले दोन निकष मराठीच्या बाबतीत समाधानकारक आहेत. राष्ट्रसदृश आकारमानाचा हक्काचा भूप्रदेश आणि सुमारे दहा कोटी भाषकसंख्या ही मराठीची मोठीच जमेची बाजू आहे. मात्र, अन्य निकषांचा विचार केला तर मराठीला उद्याप मोठा पल्ला गाठायचा आहे हे लक्षात येते. विज्ञान, तंत्रज्ञान, उद्योग, वाणिज्य, विधी व न्याय, उच्च शिक्षण आदी प्रगत व्यवहारक्षेत्रांतील मराठीच्या वापराची व्याप्ती व गुणवत्ता चिंताजनक आहे. मराठीला आधुनिक माहिती-तंत्रज्ञानाची जोड देण्यात आपण खूपच मागे आहोत. मराठीच्या विकासाबाबत राजकीय इच्छाशक्तीचा अभाव आहेच; पण सामाजिक इच्छाशक्तीही क्षीण आहे. मराठी भाषकांच्या इंग्लिश माध्यमाच्या शाळांना मिळणारा वाढता प्रतिसाद लक्षात घेता दोन पिढ्यांतील भाषिक, सांस्कृतिक संक्रमणही बाधित झाले आहे. इंग्लिश माध्यमाच्या शाळांपुढे मराठीचा भाषिक व सांस्कृतिक पायाच उखडला जात असून त्याचा फटका मराठी शाळा, मराठी नाटक, मराठी चित्रपट, मराठी साहित्य, मराठी नियतकालिके आदींना बसत आहे. मराठी भाषकाचा मातृभाषेतील शिक्षणाला नुसता विरोध नाही; तर त्याला पुढील पिढ्यांची मातृभाषाच बदलायची आहे. असे तो का करीत असेल? किंवा तसे करणे त्याला का भाग पडत असेल?

मराठी ही राज्याची राजभाषा आहे आणि मुंबई व काही महानगरे वगळता उर्वरित महाराष्ट्रातील बहुसंख्याकांची दैनंदिन व्यवहाराची भाषा आहे. पण एवढी एक गोष्ट वगळली, तर सामाजिक प्रतिष्ठा, बौद्धिक कामांचे मानधन, उच्च शिक्षण व संशोधनाचे माध्यम, माहिती तंत्रज्ञानाची उपलब्धता, अर्थार्जनादी संधी, बाजारमूल्य, ग्रंथ व शब्दभांडार, प्रथम व द्वितीय भाषा म्हणून अभ्यासाची साधने इ० बाबतींत मराठी व इंग्लिश या दोन भाषांमध्ये प्रचंड तफावत आहे. मराठीच्या सक्षमीकरणाची कोणतीच ठोस यंत्रणा राज्यात नसल्यामुळे दिवसेंदिवस ही तफावत वाढतेच आहे. त्यामुळे राज्यात ‘मराठी शिक्षित नाहीरे वर्ग’ व ‘इंग्रजी शिक्षित आहेरे वर्ग’ अशा दोन जाती निर्माण होण्याची शक्यता आहे. इंग्लिशच्या प्रेमापोटी नव्हे तर तिच्या व्यावहारिक उपयुक्ततेमुळे व शासनाच्या नाकर्तेपणामुळेच लोक मराठीकडून इंग्लिशकडे वळत आहेत. मराठी शाळांना घरघर लागली आहे. मराठीचे नाट्यचित्रपटादी कलाक्षेत्रही आपला लोकाश्रय कमी झाला म्हणून चिंतेत आहे. प्रसार माध्यमांतील मराठीच्या वापराची (प्राईम टाईमच्या न्यूज बुलेटिनमधील हेडलाईन्स) गुणवत्ताही ढासळते आहे. मराठी भाषा शिकण्याच्या व ती वापरण्याच्या प्रेरणा क्षीण झाल्या आहेत.

**भाषेचे अर्थकारण**

आजवर मराठी भाषेच्या प्रश्नाकडे आपण सांस्कृतिक किंवा अस्मितेचा प्रश्न म्हणून पाहात आलो आहोत. त्यांत सर्वथैव गैर नसले तरी तो मुख्यत: आर्थिक प्रश्न आहे. ह्या पुढे तरी मराठीच्या प्रश्नाकडे आपण आर्थिक परिप्रेक्ष्यातून पाहिले पाहिजे व देशाच्या आर्थिक प्रगतीसाठी जशी आपण कालबद्ध, नियोजनबद्ध व उद्दिष्टलक्ष्यी उपाययोजना करतो तशी केली पाहिजे. भाषांचे जतन व संवर्धन करण्यासाठी दोन मार्गांचा अवलंब केला जातो, ते मार्ग म्हणजे - (१) सक्ती आणि (२) संधी. इंग्लिश भाषेच्या संदर्भात आपण या दोन्ही मार्गांचा अवलंब करतो, मात्र मराठीचा विकास स्वेच्छाधीन ठेवतो. भाषावैज्ञानिकांसाठी सर्व भाषा 'समान' असल्या तरी सर्वसामान्य भाषकांसाठी आर्थिक मूल्य व सामाजिक प्रतिष्ठा यांबाबतींत त्या भिन्न असतात. बहुभाषक समाजात आर्थिक संधी देणारी भाषा ही प्रबळ भाषा असते आणि ती अन्य भाषांचा पारंपरिक अवकाश खाऊन टाकते. एकेका क्षेत्रात त्या भाषा मागे पडत जातात व आर्थिक सक्षमीकरणाच्या अभावी नामशेषही होतात.

भाषेची प्रगती व समाजाची आर्थिक स्थिती यांचा जवळचा संबंध आहे. इंग्लिशवर प्रभुत्व असणाऱ्या व्यक्तींचे, देशांचे दरडोई व सकळ उत्पन्न अन्य भाषकांपेक्षा अधिक आहे. असे Harvard Business Reviewमध्ये प्रसिद्ध झालेल्या एका ताज्या सर्वेक्षणातून हे पुढे आले आहे. राष्ट्रीय स्तरावर ह्याला काही देशांचा अपवाद असेलही पण सामान्यपणे हे खरे आहे. भारतात व्यक्तिगत स्तरावर तर याचा विशेष प्रत्यय येतो. भारतीय लोकांची शिक्षणाचे माध्यम म्हणून इंग्लिशला असलेली विशेष पसंती ही आर्थिक सक्षमीकरणाच्या आकांक्षेतून आलेली आहे आणि तीपासून आपण योग्य तो बोध घ्यायला हवा. भाषा वाङ्मयीन अथवा सांस्कृतिक पुण्याईवर नव्हे तर संबंधित भाषकांच्या पोटावर जगतात आणि वाढतात. आधुनिक समाज हा ज्ञानाधिष्ठित समाज आहे. ज्ञानार्जन, ज्ञाननिर्मिती, ज्ञानसंप्रेषण या शैक्षणिक व्यवहाराला व्यक्तीच्या व समाजाच्या बौद्धिक व भौतिक प्रगतीत अनन्यसाधारण असे महत्त्व आहे. ह्या शैक्षणिक व्यवहाराची जी माध्यमभाषा राहील ती खऱ्या अर्थाने उद्याची प्रगत व प्रबळ भाषा असणार आहे. भाषानिवडीचे अनिर्बंध स्वातंत्र्य देणाऱ्या कोणत्याही समाजात दोन माध्यमभाषा फार काळ टिकू शकत नाहीत. जी भाषा रोजगाराशी, उद्योगधंद्याशी, भौतिक प्रगतीशी जोडलेली असेल तीच प्रबळ भाषेची दावेदार असेल. भाषांच्या अस्तित्वाच्या लढाईत शिक्षण ही युद्धभूमी आहे. मराठी भाषेच्या संवर्धनासाठी उपाययोजना करताना अस्मितेची किंवा सांस्कृतिक उपायांपेक्षा अर्थार्जनाची भाषा म्हणून तिचे सक्षमीकरण कसे करता येईल ह्याला प्राधान्य मिळाले पाहिजे. माध्यमभाषा म्हणून 'इंग्लिश किंवा मराठी' असे असमान व मुक्त शैक्षणिक धोरण बदलून 'इंग्लिश आणि मराठी' असे शक्य तितके निरपवाद व

सक्तीचे द्विभाषाधोरण स्वीकारता येईल काय याचाही विचार झाला पाहिजे.

परंतु, ह्या दिशेने काहीही पावले न उचलता मराठीला केंद्राकडून अभिजात भाषेचा दर्जा मिळवून देण्याचा आपला नसता उद्योग म्हणजे मराठीची अवहेलना व शुद्ध आत्मवंचना आहे. अंगावर फाटकी वस्त्रे असताना एक राजभाषेचा आणि दुसरा अभिजात भाषेचा असे दोन सोनेरी मुकुट धारण केल्याने काय साध्य होणार आहे?

■

## चुकीची दुरुस्ती

※ 'भाषा आणि जीवन'च्या वर्ष ३१ अंक २ (उन्हाळा २०१३) मध्ये पृ० २वर संस्थेला मिळालेल्या देणगीविषयीच्या वृत्तात देणगीदाराचे नाव श्री० अशोक जोशी असे चुकीचे पडले आहे. प्रत्यक्षात देणगीदार आहेत डॉ० आनंद जोशी (बोरीवली.) या चुकीबद्दल आम्ही दिलगीर आहोत.

※ 'भाषा आणि जीवन' : वर्ष ३०, अंक ४ मधील दुरुस्त्या

(१) पृ० ३, ओळ क्र० ९ - म०रा० दाते ऐवजी य०रा० दाते

(२) पृ० १७, ओळ क्र० १२ - 'कार्पस'मध्ये ऐवजी 'कॉर्पस'मध्ये

(३) पृ० २६, ओळ क्र० ११ - परिणामांचा ऐवजी परिमाणांचा

(४) पृ० २६, शेवटची ओळ - डोंगरी ऐवजी डोगरी

(५) पृ० २७, ओळ क्र० ११ - राज्यभाषा ऐवजी राजभाषा

(६) पृ० ७३, ओळ क्र० १९ - इंग्रजी ऐवजी इंग्रजीत

(७) पृ० ७३, खालून ओळ क्र० ३ - वाक्य ऐवजी वाक्यं

(८) पृ० ७५, खालून ओळ क्र० १४ - उत्तर ऐवजी उत्तरं

(९) पृ० ८४ - एम०एम०फील ऐवजी एम०ए०,एम०फिल

### मुद्राक्षरकला

जानेवारी १९७९मध्ये मी, ल०श्री० वाकणकर व 'एक्स्पर्टो'चे वसंत भट यांनी आय०टी०आर०ची (इन्स्टिट्यूट ऑफ टायपोग्राफिकल रिसर्च) स्थापना केली व फोटोटाईप-सेटींगच्या दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या पिढीच्या यंत्रांसाठी अक्षरवळणे, कळफलक, अक्षरांची बिंदुयुक्त रचना (डॉटमॅट्रिक्स) सर्व भारतीय भाषांसाठी करून ही सेवा जगातील मान्यवर उत्पादक संस्थांना पुरविली. त्यामुळे परत एकदा मोठी सुखद क्रांतिकारी घटना घडली. पुस्तक प्रकाशन व वर्तमानपत्रे आमूलाग्र बदलली. आज आय०टी०आर०ची अक्षरवळणे इंडस्ट्रीत स्टॅण्डर्ड मानली जातात.

**मुकुंद गोखले**, 'ललित', सप्टेंबर २०१३, पृ० ९०

# मैत्र

शरदिनी मोहिते

पुण्यात कुमठेकर रस्त्यावरच्या ट्रेनिंग कॉलेजच्या प्रॅक्टिसिंग स्कूलमधल्या इयत्ता दुसरीत आशा केळकर आणि मी भेटलो. भेटलो आणि सख्ख्या मैत्रिणी झालो. आमची ती कोवळी गोड मैत्री इतकी घट्ट की अक्षरशः परवापर्यंत तिला कधी कसली बाधा पोचली नाही... लहानपणी शाळेच्या आवारातल्या हौदाजवळ असलेल्या बदामाच्या झाडाचे बदाम दगडांनी ठेचून एकत्र घेतलेली ती आगळी तुरट चव आतापर्यंत बऱ्याचदा आठवून आम्ही तिचा आठवण आस्वाद घेत राहिलो... बारीकसारीकही गोष्टी आम्ही विसरलो नाही. एकदा असंच बोलताना आशा म्हणाली, ''अग, शाळेत इन्स्पेक्टर आलेले असताना तू कवितेतला भाग वर्गात टेबलासमोर फरशीवर निजून प्रत्यक्ष करून दाखवला होतास, मला आठवतंय

उंच पाटी पालथी उशाखाली  
हात दोन्हीही आडवे कपाळी...

मला पण आठवत होतं. पण हिलाही आठवतंय? ... गॅदरिंगमधल्या नाचाला घातलेले आकाशी परकर पोलके, गजरे... तो नाच त्या गिरक्या ते गाणं सगळं आठवायचं. तो शिकवणाऱ्या आमच्या हिवाळेबाईंसकट...

शाळेत-कॉलेजात अतिशय हुशार आणि विलक्षण बुद्धिमान म्हणून सर्वांना परिचित असलेल्या आशाला बुद्धिमत्तेचा गर्व कधीच नव्हता... शिक्षणाबद्दल तिला विलक्षण प्रेम... पुढे मोठी झाल्यावर कॉलेजात ज्यु० बी०ए०ला असताना सुटीत तिनं डेक्कन कॉलेजात जाऊन भाषाशास्त्र अभ्यासायला सुरुवात केली. लिंग्विंस्टिक्सचा तिथला सखोल अभ्यास तिच्या आयुष्याला एक चांगली आणि पक्की दिशा देऊन गेला. मराठी, संस्कृत, हिंदी, थोडंफार बंगाली, जर्मन आणि उत्कृष्ट इंग्लिश यांचा तिचा व्यासंग थक्क करणारा असा. आदिवासींच्या (निहाली इ०) भाषांचाही तिनं अभ्यास केला. माझ्याकडे असलेलं 'हसतखेळत कानडी' हे पुस्तक तिला हवं होतं, तिला द्यायला मी वर काढूनही ठेवलं होतं; पण ते आता राहिलंच. परवा तिनं मला २९ डिसेंबर दुपारी साडेतीनला मुद्दाम बोलवून घेतलं होतं; त्या वेळी आमचे दोन तास अतिशय आनंदात गेले. 'खवटकोप्पि' हे आडनाव तिनं सांगितलं तेव्हा आम्ही खूप हसलो... 'शांतला' ही कानडीतली प्रसिद्ध कादंबरी. के०व्ही० अय्यर यांच्या या कादंबरीचा मराठी अनुवाद महाकवी द०रा० बेंद्रे

यांनी केलेला, माझ्याकडे नुकताच आलेला. त्यावर बोलणं झालं तेव्हा ती म्हणाली, ''मस्त आहे. आज ती मला पुन्हा वाचायची आहे.'' पुस्तक हातात घेऊन त्याच्याकडे कितीतरी वेळ पाहून तिनं उशाखाली ठेवून घेतलं!...

आशा आणि मी कितीतरी काळ भेटत राहिलो... शक्य तितक्या जास्त वेळा. पण मधे जवळजवळ वीस वर्षं आमची भेट नव्हती! ती आशा केळकरची आशा मुंडले झाली. ती परदेशातच नोकरीनिमित्त जर्मनीला, अमेरिकेला कितीतरी वर्षं होती. इथे परतल्यावर ती एकदा आमच्या आक्काला (डॉ० सरोजिनी बाबर) भेटली. तेव्हा एका मीटिंगला तिनं माझी चौकशी केली. त्यानंतर दुसऱ्याच दिवशी, मीटिंगच्या वेळी आम्ही भेटलो, वीस वर्षांनी, त्याच आमच्या शाळेत, ट्रेनिंग कॉलेजच्या...!

नंतर आम्ही नेहमीच भेटत राहिलो. ती आमच्या घरातलीच एक झाली. घरातल्या प्रत्येक चांगल्यावाईट प्रसंगात भेटत राहिली.

आमच्या समाज शिक्षणमालेत तिनं दोन अप्रतिम पुस्तकं लिहिली. ती अशी : (१) निरक्षरांचं जग (२) निहाली माणसं... इतरही लेख ती लिहीत होती. 'घर' हा तिच्या लेखांचा संग्रह प्रसिद्ध आहे... तिनं भाषणं दिली, लेख लिहिले. स्त्रियांबद्दल तिचा दृष्टिकोण अगदी समतोल होता. कुठेच कधीच अतिरेकी, अनाठायी अभिमान किंवा हिरीरी नव्हती... काही प्रमाणात तिनं समुपदेशनाचं काम केलं. घरगुती औषधांचीही तिला चांगली माहिती होती. जपानी तंत्र वापरून कितीतरी जणांना तिनं सायटिकाच्या दुखण्यातून वर यायला मदत केली. शिवाय एक गोष्ट फारशी कोणाला माहीत नाही. तिला भविष्य कळायचं. शास्त्रही थोडंफार. आणि सकाळच्या वेळी बऱ्याचदा तिला स्वत:च्या तळहाताकडे पाहून स्वत:ला पडलेल्या किंवा कोणी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरं स्पष्ट कळत!

आशानं स्वत:ही लिहिलं आणि मलाही अधिक लिहितं केलं. 'पालक शिक्षक'मध्ये माझे काही लेख प्रसिद्ध केले. आणि काही वर्षं चालवलेल्या 'निनाद फीचर्स'मधूनही कितीतरी लेख प्रसिद्ध केले... वेगवेगळ्या विषयांवरचे, तिचा मला विषय सांगणारा फोन यायचा. ती म्हणायची, 'यावर लेख तयार कर. अमुक दिवशी न्यायला येते...' 'भाषा आणि जीवन'मध्येही लिहायला लावलं... फोनवरून आमच्या चर्चा व्हायच्या आणि एकेक लेख तयार व्हायचे... आताही काही लेखांची तयारी झालेली आहेच आमची...

आशाने अनेक परदेशी लोकांना मराठी शिकवलं. इरिना ग्लुश्कोवा या रशियन, तर ॲन फेल्ड हाऊस आणि मेरी या अमेरिकन शिष्या यांच्याशी कित्येकदा मी बोलले आहे. इतकं सुरेख आणि सहज शुद्ध मराठी बोलतात त्या... 'अग बाई' असंही अगदी सहज. आपल्याकडून एखादा परका शब्द मराठी बोलताना बोलला जाईल; पण त्यांचं मराठी खरोखरच 'शुद्ध'. इथं गुरूचं खरं गुरूपण दिसतं... इतरही कितीतरी शिष्य कुठे कुठे (उदा० न्यूझीलंड) आहेत. भाषाविषयक सरकारी आस्थापनांमध्ये तिने अनेक उच्चपदे

भूषवली. दिल्लीत बदली झाल्यावर तिने तिथेही वाङ्मय-संशोधन विषयक भरीव काम केले...

'निनाद फीचर्स' चालू असताना आमचे कधीकधी वाद व्हायचे. कोणी मरण पावलं की हिचा फोन. तू लिही... किशोरकुमारपासून सुरुवात झाली. मग राज कपूर काय हेमंतकुमार काय अनेक जण झाले. शेवटी मी तिला सांगितलं, ''आता कोणीही मरू दे! मी लिहिणार नाही!!'' आणि एक मुद्दाम एक चांगल्या प्रसंगासाठी लेख लिहिला- मन्ना डे यांच्या गायन कारकिर्दीवरचा!.. तोही तिला फार आवडला. पण पुन: म्हणून स्मृतिलेख लिहिला नव्हता... आणि आता हा लेख लिहावा लागला... कारण ती स्वत: जाऊन बसली ना! आणि आमच्या मैत्रीच्या अमृत कणांना उजाळा देत बसले मी!

परवाच्या भेटीत नव्यानं घेतलेल्या मोबाईलचा नंबर मला तिनं लिहून दिला आहे... पण त्यावर आमचं एकदाही बोलणं झालं नाही!... आता आमची अशीच भावनिक बोलणी व्हायची!... मैत्रीतर अमर आहे ना!!

■

## श्रद्धांजली

( १ ) आशा मुंडले यांचे ११ जानेवारी २०१४ला वयाच्या ७८व्या वर्षी निधन झाले. त्यांनी भाषाविज्ञान व समाजशास्त्रात एम०ए० केले होते. त्या मराठी अभ्यास परिषदेशी सुरुवातीपासून जोडलेल्या होत्या. त्या अनेक वर्षे संस्थेच्या कार्यकारी मंडळाच्या व संपादक मंडळाच्या सदस्य होत्या. त्या विदेशी मंडळींना भारतीय भाषा शिकवीत असत.

१९६२ ते ६६ मध्ये त्या शिकागो विद्यापीठाच्या मुंडा प्रकल्पात संशोधन अधिकारी म्हणून सहभागी होत्या. त्या काही वर्षे राष्ट्रीय शिक्षण संशोधन व प्रशिक्षण मंडळात अधिव्याख्यात्या होत्या. त्यांनी म० फुले यांच्या 'शेतकऱ्याचा असूड'चे इंग्रजीत भाषांतर केले आहे. त्यांनी 'घर', 'निहाली माणसे' आदी पुस्तके लिहिली आहेत. त्यांचे अनुवादाचे कामही भरीव स्वरूपाचे आहे. त्यांच्या लेखनाला सामाजिक विचारांची बैठक होती. पुण्यातील अनेक सामाजिक संस्थांच्या कामात त्यांचा सहभाग असे.

( २ ) मुद्रणतज्ज्ञ चिं०स० लाटकर आणि ज्येष्ठ दलित कवी नामदेव ढसाळ यांचेही नुकतेच निधन झाले.

या सर्वांच्या निधनाबद्दल मराठी अभ्यास परिषद शोक व्यक्त करीत आहे.

# पुरोपकंठी

*सुंदर परडी घेउनि हातीं पुरोपकंठी शुद्धमती*
*सुंदर बाला या फुलमाला रम्य फुले-पत्री खुडती.*

बालकवींच्या 'श्रावणमास' या प्रसिद्ध कवितेतल्या ह्या दोन ओळींमधील 'पुरोपकंठी' ह्या शब्दाचा अर्थ काय असावा असा प्रश्न आहे.

प्रसिद्ध समीक्षक प्रा० रमेश तेंडुलकर ह्यांनी 'बालकवींची कविता : तीन संदर्भ'मध्ये (पृ० २४) असे म्हटले आहे : 'आपल्या कवितेचा सूर हळुवार राहावा, पोत तलम राहावे यासाठी एखादा कवी काही प्रकारचे शब्द, कल्पना यांना टाळण्याची जाणीवपूर्वक काळजी घेईल. उदाहरणार्थ, खिडकी, पडदा, चौक, क्रीडांगण, फलक यांसारखे मुळातच नादसौंदर्याचा अभाव असलेले गद्य प्रकृतीचे शब्द; तती, मोद, कौमुदी, शशांक, क्षौम, धौत, यांसारखे सर्रास वापरात नसणारे संस्कृत शब्द; त्यातलाच 'ध्वांत'सारखा एखादा टणक शब्द; नभ:पट, वाङ्निश्चय, जगदंतर, पुरोपकंठ यांसारखे भावकवितेच्या प्रकृतीला जड वाटणारे सामासिक शब्द; निर्लज्जसारखा अपशब्द...स्वतंत्रपणे विचार केला तर यांतला एकेक शब्द या ना त्या कारणासाठी पण भावकवितेच्या प्रकृतीला फारसा अनुकूल वाटत नाही. परंतु बालकवींच्याच कवितेतले हे सगळे शब्द आहेत.'

ह्या उल्लेखावरून पुरोपकंठ हा सामासिक शब्द आहे हे तर नक्की होते. कवीने असे काही शब्द इतरत्रही वापरले आहेत का हे बघताना 'गवताचे गाणे' ह्या कवितेत दोन ओळी अशा दिसतात : 'परस्पराकंठीं हात घालुनिया बसलों गात ऐको ना ऐको कोणी ही अमुची वेडी गाणी...' तर इथे परस्परांच्या कंठी अशी दोन शब्दांची जोडणी दिसते. 'नीलकंठ' म्हणजे ज्याचा कंठ नील आहे तो हेही आपल्याला माहीत आहेच. तर मग असेच 'पुरोपकंठी'तले दोन शब्द कोणते; ह्या प्रश्नाच्या उत्तरात कंठ हा मुख्य शब्द आहे हे तर नक्कीच. मग आता राहतो पुरोप. आता पुरोप असा शब्द काही आपण ऐकलेला नाही. मग त्यातही दोन शब्द जोडलेले असावेत, असे वाटून पुर म्हणजे नगर व उप म्हणजे त्याच्या सीमेवर असा विग्रह करून ह्या बाला शहराच्या सीमेवरून फुले-पत्री वगैरे आपल्या परडीत टाकीत आहेत असा अर्थ निघतो. तेंडुलकरांनी असाच काढलेला अर्थ आहे. पण इथे जरा गफलत होते आहे. वर्णन निरागस (शुद्धमती) बालिकांचे आहे. त्या फुले कुठे वेचत आहेत हे गौण बाबींचे वर्णन कवी कशाला करील? शिवाय जुन्या





अनुक्रमणिका

नगररचनाशास्त्राने जरी सिद्ध केले की त्या काळी नगरांच्या सीमेवर बागा असत, तरी ज्यावेळी बालकवींनी ही कविता लिहिली त्या वेळी नगरसीमेवर बागा होत्या काय? नसाव्यात. कारण फुलझाडे ही प्राय: घराभोवती देखरेखीतच येतात. त्यामुळे पुरोपकंठी हे बालिकांचेच विशेषण असले पाहिजे. पुरो म्हणजे पुढे (जसे : पुरोगामी, पुरोहित, पुरोभागी मधले), उप-कंठी (गळ्यात) घातलेल्या व निरागस (शुद्धमती) ह्या जणू फुलमालाच आहेत, असे का होऊ नये? कारण कवी बालांचे वर्णन करीत आहे. बरे त्या बागेत फुले खुडत आहेत असे कोणी म्हटलेले असते, पण 'नगराच्या सीमेवर' हे कसले स्थळ? आणि ते बागेचे आहे हे कशावरून? भावकवितेच्या प्रकृतीला 'पुरोपकंठी फुलमाला' जास्त शोभणारे आहे!

ह्या कवितेचे रसग्रहण करताना तेंडुलकर म्हणतात, 'पुरोपकंठी'सारखा अवजड शब्द नादलयीत कसा विरघळवून टाकला आहे, याचा उल्लेख मागे येऊन गेला आहे. जणू काय तो त्या सुंदर मुलींच्या कंठातला एक अलंकारच असावा, तसा तो तेथे शोभून दिसतो. हातात सुंदर परडी घेऊन रम्य पत्री-फुले खुडणाऱ्या त्या 'सुंदर बाला' दुरून फुलमाला भासतात असे दर्शवून (सुंदर बाला या फुलमाला) बालकवींनी निरागस सौंदर्य आणि निसर्गसौंदर्य एका रेषेत आणले आहे.' ह्या अर्थ लावण्यातही पुरोपकंठी ह्या शब्दाचा अर्थ एक अलंकारच भासतो असे तेंडुलकर जवळजवळ कबूल करीत आहेत. केवळ केवडा वनात येतो म्हणून 'पुरोपकंठी'चा अर्थ नगराची सीमा करणे ही अर्थ ताणण्याची सीमाच वाटते. बरे त्यात सौंदर्य तरी काय? सौंदर्य भासावे ते बालांचे की सीमेचे? शिवाय हा शब्द हळुवारपणात न शोभणारा आहे असे ते म्हणतात ते त्याच्या काढलेल्या अर्थावरूनच. भासलेल्या अर्थावरून (म्हणजे एक अलंकार) तो त्यांना नादमय वाटतो हेही जरा विरोधाभासीच होते व त्यातून पुरोपकंठी म्हणजे एक उरोभूषण हेच ठसते!

**अरुण भालेराव**

पुरोपकण्ठी या शब्दाचा साधा अर्थ पुराच्या म्हणजे नगराच्या जवळ असा आहे. कालिदासाच्या काव्यात 'नगरोपकण्ठे' आणि 'उपकण्ठं महोदधे:' (समुद्राच्या काठाजवळ) असे प्रयोग आहेत. तेव्हा नगराच्या सीमेजवळ असाच या शब्दाचा अर्थ आहे. संशय असल्यास कालिदासाचे प्रयोग बघावेत.

**माधव देशपांडे**

'ज्ञानेश्वरी'तल्या - *तरि अस्तगिरिचां उपकंठीं । रिगालेया रविबिंबा पाठीं ।*
*रश्मी जैसे किरीटी । संचरति गा ॥१२.३५॥*

या ओवीत उपकंठी हा शब्द जवळ या अर्थाने आला आहे. पण पुरोपकंठी म्हणजे काय ते लक्षात येत नाही.

**उमेश करंबेळकर**





अनुक्रमणिका

उपकंठ म्हणजे नजीकचा भाग, पुरोपकंठ म्हणजे नगरानजीकचा, आसपासचा भाग.

**विजय पाध्ये**

धन्यवाद, विजयराव. पण मला एक दुसरा अर्थ सुचतोय. पुरस् म्हणजे पुढे किंवा समोर, उपकंठी म्हणजे जवळ. पुरस् + उपकंठी = पुरोपकंठी. म्हणजेच जवळपास असा असावा. कारण पूर म्हणजे शहर. येथे दीर्घ पू आहे. पुरोपकंठीमध्ये ऱ्हस्व पु आहे. म्हणून मला असे वाटते.

**उमेश करंबेळकर**

पुर हा मूळ शब्द संस्कृत असून मराठीत तो काहीकाही वेळा प्रत्यय लागला की ऱ्हस्व होतो. जसे कोल्हापूर, मलकापूर, नागपूर हे शब्द वापरताना सर्वत्र 'पूर' असे दीर्घ उकार योजून लिहिले व उच्चारले जातात. परंतु त्याच शब्दांना सप्तमीचे प्रत्यय लागले की कोल्हापुरात, मलकापुरात, नागपुरात पू चे पु होते; तर चतुर्थीचा ला हा प्रत्यय लागला की कोल्हापूरला, मलकापूरला, नागपूरला असे ते मूळ स्वरूपातच राहतात, मात्र चतुर्थीचाच स हा प्रत्यय लागला तर पुर असा मूळ रूपातलाच राहतो. पाहा - गतवर्षी ह्याच महिन्यात कोल्हापुरास आलो असताना... (हिंदीत मात्र प्रत्यय वेगळे योजायची पद्धत असल्याने मूळ संस्कृतमधले शब्द - तत्सम - जसेच्या तसे, म्हणजे अविकारी स्वरूपात राहतात.)

पुर ह्या शब्दाचा घर असाही अर्थ आहे की! आपट्यांच्या संस्कृत-इंग्लिश कोशात a house, residence, acode; the cody; the female apartments वगैरे अर्थही दिलेले आढळतात. परंतु प्रस्तुत विषयात तो अर्थ लागू होत नाही.

**विजय पाध्ये**

Meaning is usage असे म्हणतात. शिवाय कालांतराने काही काही शब्दांचे अर्थ मूळ अर्थाच्या अगदी विरुद्ध टोकाला पोचतात असेही आढळते. जसे : परोक्ष व अपरोक्ष. त्यामुळे, माधवराव, आपण जेव्हा म्हणता, संशय असल्यास कालिदासाचे प्रयोग बघावेत, हा मला योग्य पवित्रा वाटतो. पण समजा, तो तसा आढळला, तर फार फार तर कालिदास काली 'पुरोपकंठी'चा वापरातला अर्थ नगराच्या जवळ/सीमेवर असा होता एवढेच अनुमान नक्की होईल. सध्या लोक हा शब्द कशा अर्थाने वापरतात ह्यासाठी परत वेगळेच सर्वेक्षण करावे लागेल.

परवा एक शोधनिबंध वाचत असताना टोरंटो वर्ड लिस्टच्या एक हजार शब्दांचे (इंग्रजी) कोणी तरी केलेले विश्लेषण वाचले. त्यात त्याने काही काही शब्दांचे चित्रीकरण (टु फॉर्म इमेज) होण्याच्या शक्यतेनुसार ह्या शब्दांना ते १ ते ७ दरम्यानचे गुण देऊन तशी यादी व त्याचे पृथक्करण केलेले होते. आजच्या अभ्यासकांनी असेच जर

'पुरोपकंठी'चा अर्थ काय भावतो असे सर्वेक्षण केले तर बराच काळ वापरात नसल्याने व कंठा/कंठी ह्या उत्तर कंठभूषणांच्या साहचर्यामुळे, बहुतेक 'एक अलंकार' असाच ह्या शब्दाचा अर्थ निघावा.

अर्थात ह्या विषयावर आधी चर्चा झालेली असल्याने हा अट्टहास वाटेल, पण अर्थांचे असणे व बदलणे ह्यावर काही प्रकाश पडेल.

**अरुण भालेराव**

'मराठी शब्दरत्नाकर'मध्ये उपकंठी = गळ्यातील हार आणि पुरो म्हणजे पुढील भागी अशा अर्थाने गळ्यात हार घातलेल्या बाला असा अर्थ लावला असल्याचे स्मरते.

**आनंद काटीकर**

या चर्चेत भाग न घेता गंमत बघत मी आतापर्यंत गप्प बसले होते, पण आता राहावत नाही. पुरोपकंठी या शब्दाबाबत अशाच प्रकारची चर्चा भारताबाहेरील मराठी-मित्रांमधे पाच वर्षांपूर्वी घडली होती. त्या वेळी मी या संपूर्ण कवितेबद्दलच एक पत्र लिहून तिचा समारोप केला होता, त्या पत्रातील संबंधित भाग इथे उद्धृत केला आहे तो पाहावा. त्यातील आपल्या चर्चेसाठी मुख्य मुद्दा हा जुन्या आणि नव्या शुद्धलेखनातील फरक, आणि त्यामुळे उडणारा गोंधळ हा आहे, हे सहज लक्षात यावे. १९३७ सालचे अर्थ पाहिले तर आपली आणि आपल्या पुढच्या पिढीतल्या अजाण वाचकांची दिशाभूल सहज टळेल. अर्थात केवळ मनोरंजन म्हणून आपण काहीही अर्थ लावायला मोकळे आहोतच!

पुरोपकंठी ह्या शब्दाच्या शेवटच्या अक्षरावर निश्चितच अनुस्वार होता, आणि अजूनही बालकवींची ती कविता जिथे जिथे छापलेली आहे, त्या दोनतीन नव्याजुन्या पुस्तकांत तो अनुस्वार आढळतो. (पाहा : मुलांकरिता काव्यसंग्रह, पुस्तक पहिले, १९३७, पान ६०. आठवणीतल्या कविता (भाग १), पान ८३. निवडक बालकवी, संपादक वामन देशपांडे, वाल्मीक प्रकाशन, मुंबई, १९९०, पान २८-९.)

पुर + उपकंठ अशीच त्या शब्दाची फोड आहे. उपकंठ हा शब्द जवळपास, नजीक, शिवेवर, अशा अर्थाने संस्कृत, हिंदी आणि मराठी असा तीन भाषांतून वापरला जातो. भार्गव हिन्दी-अंग्रेजी डिक्शनरीमध्ये पान १३८वर दिलेली एक उतारी अशी आहे -

उपकंठ - (n. mas.) proximity, nearness, vicinity.

पुराच्या उपकंठीं म्हणजे गावाच्या शिवेवर. उपकंठ ह्या शब्दातल्या कंठचा अर्थ गळा असा न घेता, काठ हा जो शब्द मराठीत कंठपासूनच आलेला आहे, तो घेतल्यास, गावाच्या काठावर, गावाच्या सीमेवर, म्हणजे शिवेवर, असे अर्थ नीट समजू शकतात.

पुरोप असा काहीही शब्द (तिन्हीपैकी एकाही भाषेत) नाही. आणि 'पुरोपकंठी' म्हणजे गोल गळ्याची असा अर्थ तर अजिबातच संभवत नाही. 'मुलांकरिता काव्यसंग्रह : पुस्तक पहिले', संग्राहक : कै० विनायक माधव मोहरीर, व वासुदेव सखाराम कवीश्वर,

१९३७. असा एक संग्रह माझ्याजवळ आहे, त्यात बालकवींचे हे 'श्रावण महिन्याचे गाणे' छापून शेवटी काही शब्दांचे अर्थही दिलेले आहेत, ते असे :

शिरवें - पावसाची सर, जलद - मेघ, संध्याराग - संध्याकाळी आकाशांत दिसून येणारे रंग, बलाक - बगळा, कल्पसुमांची - कल्पवृक्षाच्या फुलांची, पुरोपकंठीं - शहराबाहेरील बागेत, शुद्धमति - मनाने पवित्र, दरवळला - सुगंध पसरला.

तेव्हा तिथेही 'पुरोपकंठी' शब्दाचा अर्थ मी सांगितलेल्या अर्थाशी जुळतो.

**विद्युल्लेखा अकलूजकर**

**ह्या चर्चेत सहभागी झालेल्या व्यक्तींचे ई-पत्ते पुढीलप्रमाणे :**


अकलूजकर, विद्युल्लेखा vidyut@shaw.ca

करंबेळकर, उमेश umeshkarambelkar@yahoo.co.in

काटीकर, आनंद anand.katikar@gmail.com

देशपांडे, माधव mmdesh@umich.edu

पाध्ये, विजय v.wordsmith@gmail.com

भालेराव, अरुण arunbhalerao67@gmail.com


■

**'वाचन : एक ध्यास'**

आपण वाचनासंदर्भात बोलतो तेव्हा कोणाच्या वाचनाविषयी बोलतो? वेळ जात नाही म्हणून केल्या जाणाऱ्या वाचनाविषयी आपण बोलत नाही. आपणासाठी हा फावल्या वेळाचा व्यापार नाही. आपण त्यासाठी आपल्या एकमेव आयुष्यातला अमूल्य वेळ देत असतो. किंबहुना आपण वाचतो त्यातून बहुतांश वेळा आपण डोक्याला तापच देत असतो. आपण वाचत असलेल्या ग्रंथांच्या प्रकाशात आपले आयुष्य तपासत असतो आणि 'आपले आयुष्य' असे म्हणत असताना ते काही आपल्या एकट्याचे केवळ खासगी आयुष्य नसते. त्यात ते तर असतेच; पण त्याच्यासोबत आपले कुटुंब, सगेसोयरे, आपला समाज, आपला देश, अवघे चराचरविश्व, निसर्गातील सजीव आणि निर्जीव सृष्टी, आणि आपला इतिहास आणि भूगोल असा विशाल गोतावळा यात असतोच असतो. आणि त्यानंतर या तपासात आपल्या वाट्याला येतात विविध अनुभवांचे क्षण, आशा, निराशा, उमेद, उत्साह आणि खिन्नताही.

**सतीश काळसेकर,** कृषीवल, दिवाळी २०१२, पृ० ७४

## महाजालावरील मराठी

# अवकाशवेध

सुशान्त देवळेकर

एखाद्या विषयाची तोंडओळख करून देणे हे काम मर्यादित स्वरूपाचेच असते. पण तरीही अनेक नवख्या व्यक्तींना अशा तऱ्हेच्या साहाय्याची आवश्यकता असते. खगोलशास्त्राची अशी बऱ्यापैकी चांगली तोंडओळख करून देणारे संकेतस्थळ म्हणून अवकाशवेध (http://www.avakashvedh.com) ह्या मराठी संकेतस्थळाचा उल्लेख करता येईल. सूर्यमाला, आकाशात दिसणारे तेजोगोल, तारकासमूह ह्यांविषयी जिज्ञासा असलेल्या व्यक्तींना शालेय पाठ्यपुस्तकापेक्षा थोडी अधिक माहिती देणारे, तसेच अवकाशनिरीक्षणाचा ओनामा करताना आवश्यक ती माहिती पुरवणारे हे संकेतस्थळ आहे.

ह्या संकेतस्थळाचे दृश्य रूप आकर्षक आहे. विषयाच्या मांडणीच्या दृष्टीने आणि अभिप्रेत असलेल्या वापरकऱ्यांच्या दृष्टीनेही संकेतस्थळाच्या रचनाकाराने बऱ्यापैकी विचार केलेला आढळतो. लहानसहान पण उपयुक्त माहिती ठिकठिकाणी पुरवली आहे.

संकेतस्थळाच्या 'मुख्य पाना'वर (मुंबईच्या अक्षांश-रेखांशाप्रमाणे) सूर्योदय, सूर्यास्त आणि चंद्रोदय, चंद्रास्त ह्यांच्या त्या त्या दिवसाच्या वेळा दिसतात. 'हा महिना' ह्या विभागातील 'ह्या महिन्यातील ग्रहस्थिती' ह्या दुव्यावर चालू महिन्यात अवकाशात ग्रहांची स्थिती कशी असेल ह्याची माहिती सापडते. 'ह्या महिन्यातील अवकाश' ह्या दुव्यावर महिना निवडून अवकाशचित्र पाहता येते. त्यावरून ताऱ्यांची स्थिती कळून येते.

'विशेष घटना' ह्या विभागात अवकाशात त्या महिन्याभरात घडणाऱ्या विशेष घटनांची दिनांकवार माहिती दिलेली असल्याने अवकाशनिरीक्षणाची आखणी करताना त्याचा उपयोग होऊ शकतो. 'उल्कावर्षाव' ह्या विभागात महिन्याभरात कोणत्या तारकासमूहात कोणत्या दिनांकाला उल्कावर्षाव पाहता येईल ह्याची माहिती नकाशासह दिलेली असते. त्याच विभागात 'उल्कावर्षावाचे निरीक्षण कसे करावे' ह्याबाबत सविस्तर माहिती दिलेली आहे. 'ओळख सूर्यमालेची' ह्या विभागात सूर्यमालेतील विविध घटकांची माहिती नोंदवलेली आहे. 'इतर माहिती' ह्या विभागातील 'काही जोडतारका' ह्या उपविभागात जोडतारका, त्या कुठल्या तारकासमूहात आहेत, त्यांच्या घटकतारकांच्या प्रती, त्यांचे दृश्य (कोनीय) अंतर ह्यांचा तक्ता दिलेला आहे.

'अधिक माहिती' ह्या विभागात 'महाराष्ट्रातील काही ठिकाणांचे अक्षांश आणि रेखांश' ह्यांचा तक्ता, 'ग्रहताऱ्यांच्या आकाराचा' तक्ता, 'इतर ग्रहांवरील आपले वय',

'इतर ग्रहांवरील आपले वजन', 'धूमकेतूंना नावे देण्याची पद्धती' अशी माहिती दिलेली आहे. प्राचीन भारतीय खगोलशास्त्र आणि खगोलशास्त्रज्ञ ह्यांचीही थोडीफार माहिती संकेतस्थळावर आहे. मात्र, आधुनिक खगोलवेत्त्यांमध्ये डॉ० जयंत नारळीकर ह्यांची माहिती आहे तशी इतर अभ्यासकांचीही यायला हवी होती, असे वाटल्यावाचून राहत नाही.

'सुरुवात' ह्या शीर्षकाच्या विभागात खगोलशास्त्राचा अभ्यास करताना सुरुवातीला कशा तऱ्हेची पुस्तके वाचावीत, दुर्बीण घेताना ती केव्हा घ्यावी, घेताना कोणता विचार करावा ह्यासारख्या गोष्टींचा विचार केला आहे. (पुस्तकांच्या यादीत डॉ० जयंत नारळीकर ह्यांची इतर पुस्तके असली तरी 'आकाशाशी जडले नाते' हे पुस्तक आढळत नाही, हे खटकतेच.) निरीक्षणाची नोंद कशी करावी ह्याची माहिती जिथे दिली आहे तिथेच खगोलशास्त्राविषयीची महत्त्वाची संकेतस्थळे आणि संगणकीय आज्ञावल्या (सॉफ्टवेयर) ह्यांचे दुवेही पुरवले आहेत. ही सर्व सामग्री नव्याने अवकाशनिरीक्षण करणाऱ्या व्यक्तींना अतिशय उपयुक्त आहे. नव्याने खगोलशास्त्राचा अभ्यास करू इच्छिणाऱ्या सर्वसामान्य व्यक्तींना कोणती माहिती आवश्यक आहे आणि त्यांनी कोणत्या गोष्टी टाळलेल्या बऱ्या हे ह्या विभागात नीट समजावून दिलेले आहे.

'इतर माहिती' ह्या विभागात खगोलशास्त्रातील संज्ञा दिलेल्या आहेत. तिथे दिलेली माहिती ही नेमकी शास्त्रीय लक्षणे नाहीत. ती सोपी करण्याचा प्रयत्न आहे. मात्र अनेक ठिकाणी ही माहिती भाषांतरित स्वरूपाची आहे. वाक्यरचनाही तशीच दिसते. उदा० असे वस्तुमान जे अस्तित्वात असलेल्या वस्तुमानाच्या विरुद्ध गुणधर्मांचे आहे. अशा ठिकाणी वाक्यरचना सुधारण्याला वाव आहे.

काही ठिकाणी माहिती अद्ययावत केलेली आढळत नाही. उदा० 'अधिक माहिती' ह्या विभागात 'पुढील तीन वर्षांमध्ये बुध ग्रह दिसण्याच्या तारखा, वेळ व स्थान' ह्यावर दिलेली माहिती २०१२पर्यंतचीच दिलेली आढळते. अशा काही आणखीही त्रुटी दाखवता येतील. काहीही असले तरी सचिन पिळणकर या एका व्यक्तीने प्रयत्नपूर्वक केलेले मराठीतील हे एक चांगले संकेतस्थळ आहे ह्यात शंका नाही. ■

## स्वागत

(१) 'इंद्रजित भालेराव यांची कविता : आकलन, आस्वाद आणि आक्षेप', संपादक भगवान काळे, साक्षात प्रकाशन, औरंगाबाद, २०१३, पृष्ठे ७६०, मूल्य ₹ १,०००

(२) गाव आणि शहराच्या मधोमध' (कवितासंग्रह), शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, २०१३, पृ० १४४, मूल्य ₹ २००

(३) 'बांधिलकी' (बोली विशेषांक), कर्मवीर रामरावजी आहेर कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, देवळा, जि० नाशिक, २०१२-२०१३





अनुक्रमणिका

दखलयोग्य

# प्राचीन ज्ञान आणि आधुनिक तंत्रज्ञान

**मनीषा नित्सुरे-जोशी**

कला, विज्ञान आणि संस्कृतीचे जतन करण्यासाठी सर जेम्स मॅकेन्टोश यांनी १८०४ साली स्थापन केलेल्या मुंबईच्या दि एशियाटिक सोसायटीने (तेव्हाची बॉम्बे लिटररी सोसायटी) आधुनिक तंत्रज्ञानाची कास धरीत आपल्याकडील दुर्मीळ साहित्याचा ठेवा आता डीव्हीडींच्या स्वरूपात जतन केला आहे.

संस्थेने ही डीव्हीडी दोन भागात निर्माण केली असून पहिल्या भागात १८४१ ते १९२४ सालापर्यंतचे साहित्य समाविष्ट करण्यात आले आहे तर दुसऱ्या भागात १९२५ ते २०१३ या कालावधीत प्रसिद्ध झालेल्या लेखांची डीव्हीडी तयार केली आहे. साहित्य क्षेत्रात आपल्या प्रगल्भ विचारांचे योगदान देणाऱ्या जुन्या जाणत्या साहित्यिकांच्या साहित्याचा एक भलामोठा खजिनाच यामुळे सर्वांसाठी खुला झाला असून तो आता केवळ एका पुस्तकात किंवा एकाच ग्रंथालयात अडकून न राहता जगाच्या कानाकोपऱ्यात पोहोचू शकणार आहे.

त्यात भारतरत्न डॉ० पां०वा० काणे, न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे, डॉ० भाऊ दाजी लाड, राजाराम भागवत, भांडारकर अशा एकाहून एक विद्वानांच्या लेखांचा समावेश आहे. त्यात डॉ० स्टिव्हन्सन यांनी लिहिलेल्या 'मराठ्यांची लोकभाषा,' ज० मुर्रे मिचेल यांनी लिहिलेल्या 'तुकारामांची गाथा', तसेच डॉ० जॉन विल्सन, प्रा० एडवर्ड रिहाटसेक इत्यादींच्या अभ्यासपूर्ण लेखांचा समावेश आहे. १६४ वर्षांच्या या समग्र साहित्यात अर्थशास्त्र, इतिहास, साहित्य, राजकारण, समाजशास्त्र, धर्म, अभियांत्रिकी, तंत्रज्ञान, भारतीय विद्या आणि लोकसाहित्य अशा विविध क्षेत्रांचा समावेश असून दुर्मीळ चित्रे, नकाशे, छायाचित्रे, आकृत्या आणि आलेखांचा समावेश यात आहे. साहित्याची नाळ युवा पिढीशी जोडण्यासाठी तंत्रज्ञान फायदेशीर ठरू लागले असून, ई-बुक्स, पुस्तकांच्या डीव्हीडी या माध्यमांकडे तरुण वर्ग आकर्षित होत आहे. दोन्ही डीव्हीडी मिळून वीस हजार पाने डिजिटल स्वरूपात रूपांतरित करण्यात आली असून सुमारे एक हजारांहून अधिक लेखांचा यात समावेश करण्यात आला आहे, यावरून हा अक्षरांचा आणि विचारांचा खजिना किती मोठा असेल याची कल्पना येईल. ■

(संदर्भ : 'जतन साहित्याचे, जपणूक वाचकांची', या लेखातील संपादित अंश, मनीषा नित्सुरे-जोशी, महाराष्ट्र टाइम्स, २२ डिसेंबर २०१३, पृ० १३.)

## १. देवनागरीला जगन्मान्यता

न्यूयॉर्कच्या स्टर्लिंग प्रकाशन कंपनीने 'द वर्ल्ड एन्सायक्लोपीडिया ऑफ कॅलिग्राफी' हा प्रचंड ग्रंथ प्रकाशित केला आहे. ख्रिस्तोफर क्लॅडरहेड आणि होली कोहेन यांनी संपादित केलेल्या या ग्रंथात जगभरातील रोमन, जपानी, चिनी, देवनागरी अशा महत्त्वाच्या लिपींमधील सुलेखनपरंपरांचा अभ्यासपूर्ण मागोवा घेतला आहे. जगभरातील नामांकित सुलेखनकारांची मदत त्यासाठी घेतली आहे. त्या सुलेखनकारांमध्ये भारतातून निवड झालेले दत्तात्रय पाडेकर हे एकमेव चित्रकार सुलेखनकार आहेत. त्यांनी देवनागरी आणि गुजराती लिपीतील अक्षरांचा घाट नेमका रेखांकित केला आहे.

(संदर्भ : महाराष्ट्र टाइम्स, 'कटाक्ष' ७ सप्टेंबर २०१३, पृ० ८)

■

## २. अक्षरयोगिनी टंक

अक्षरयोगिनी हा देवनागरी मराठीच्या वळणावर बेतलेला टंक लेखिका योगिनी जोगळेकर यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ तयार करण्यात आला आहे. तो सर्वांसाठी विनामूल्य उपलब्ध आहे. अधिक माहितीसाठी पुढील संकेतस्थळाला भेट द्या :

http://aksharyogini.sudhanwa.com

■

## ३. खांडबहाले.कॉम

भारतीय भाषांमधील शब्दकोश स्मार्टफोनवर खांडबहाले.कॉमने २२ भारतीय राजभाषा स्मार्ट फोनसाठी तयार केले असून कोणत्याही android फोनमध्ये गुगल प्ले स्टोअरवर KHAND-BAHALE.COM असे शोधल्यास ते विना शुल्क डाऊन लोड करून घेता येईल.

■





अनुक्रमणिका

प्रतिसाद-१

## ‘व्हॅल्यू जजमेंट’ आणि ‘रिव्हर्स डिस्क्रिमिनेशन’

अलीकडेच एका मित्राने वरील इंग्रजी शब्दांसाठी कोणते मराठी शब्द वापरावेत असे विचारले.

‘व्हॅल्यू’ म्हणजे मूल्य, ‘व्हॅल्युएशन’ म्हणजे मूल्यांकन किंवा मूल्यनिर्धारण. पण त्यामध्ये ‘जजमेंट’मध्ये अभिप्रेत असलेला ‘व्यक्तिगत मत’ हा अर्थ व्यक्त होत नाही. उदा० ‘‘डोण्ट मेक व्हॅल्यू जजमेंट’ याचे भाषांतर कसे करायचे? मला ‘मूल्यनिर्णयात्मक (विधान)’ असा प्रतिशब्द सुचला. माझ्या मित्रालाही तो पटला. ‘भाषा आणि जीवन’च्या वाचकांपैकी कुणाला काही वेगळा शब्द सुचतोय का?

‘डिस्क्रिमिनेशन’ म्हणजे भेदभाव. भारतात दलितांबाबत आणि अमेरिकेत कृष्णवर्णीयांबाबत भेदभाव केला जात असे आणि त्यामुळे त्यांच्यावर अन्याय होत असे. त्यावर उतारा म्हणून ‘पॉझिटिव्ह डिस्क्रिमिनेशन’ ही संकल्पना व तिच्यावर आधारलेली राखीव जागांची धोरणे अमलात आली. पण त्याचा परिणाम म्हणून आता उच्चवर्णीयांविरुद्ध भेदभाव केला जात आहे, असे काही लोकांना वाटते. अशा भेदभावाला ‘रिव्हर्स डिस्क्रिमिनेशन’ अशी संज्ञा वापरली जाते. त्यासाठी मराठीत कोणता प्रतिशब्द वापरावा असा माझ्या मित्राचा प्रश्न होता. चटकन सुचणारा व शब्दशः अर्थ व्यक्त करणारा शब्द म्हणजे उलट (किंवा उलटा) भेदभाव. पण तो संज्ञा म्हणून समाधानकारक वाटत नाही. गणितातील ‘सम’(संख्या) विरुद्ध वापरला जाणारा ‘व्यस्त’ हा शब्द मला योग्य वाटला. माझ्या मित्रालाही ‘व्यस्त भेदभाव’ हा प्रतिशब्द समाधानकारक वाटला. ■

प्र०ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
चलभाष : 094225 09638

प्रतिसाद-२

## वर्किंग लंच : ई-चर्चेविषयी

‘वर्किंग लंच’वरील चर्चा वाचली. अल्पभोजन हा शब्द पुरेसा अर्थवाही वाटत नाही. या शब्दाचा अर्थ माझ्या मते असा आहे - वैज्ञानिक, व्यावसायिक, बिझनेसमन यांनी जेवण घेता केलेली कामाबद्दलची अनौपचारिक चर्चा.

‘चर्चाभोजन’ हा शब्द मला सुचवावासा वाटतो. ■

डॉ० आनंद जोशी, ई पत्ता : dranand5@yahoo.com

## फशाळ

(संदर्भ : प्रतिसाद १ - 'फशाळ', भाषा आणि जीवन, वर्ष ३१, अंक ४, दिवाळी २०१३)

'फशाळ' ह्या अपरिचित शब्दाविषयी प्र०ना० परांजपे ह्यांनी नोंदवलेली टिपणी वाचली.

'झिम्मा'च्या प्रकाशकांनी दिलेल्या स्पष्टीकरणानुसार हा शब्द जरी एका विशिष्ट भागात योजला गेलेला असला, तरी त्याचा अर्थ ऽजवळपास फसला गेलेला वा अडचणीत/जाळ्यात अडकला जाणाराऽ असा होतो व मराठीत त्याच धर्तीवरील कुचाळ, मधाळ ह्यांसारखे शब्द प्रचारात आहेत हे मान्य व्हावे.

असाच एक शब्द आहे 'बैलबुजाळ'. बैलांना बुजवणारा, घाबरवणारा अशा अर्थाचा हा वऱ्हाडी बोलीतील शब्द पुरुषोत्तम बोरकर ह्यांच्या 'मेड इन इंडिया' या कादंबरीत आढळतो. बोली भाषांच्या अभ्यासकांना ह्या कादंबरीच्या रूपात समोर आलेली ही वऱ्हाडी बोलीची सुग्रास मेजवानीच वाटावी.

वाचकांना अशा मराठी शब्दांच्या श्रीमंतीचा नक्कीच अभिमान वाटेल.

■

विजय पाध्ये, 4 चित्रा, बी, विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037.
स्थिरभाष : (020) 2441 1951

प्रतिसाद-४

## अवघड काम

'भाषा आणि जीवन'चे अंक बघून हे काम किती मोठे आहे आणि अवघडही आहे याची कल्पना येते. परिषदेसाठी किंवा 'भाषा आणि जीवन' त्रैमासिकाकरता काय करता येईल याचा शोध घेण्याचा बरेच दिवस प्रयत्न करीत होते. आता याक्षणी मला देणगी देण्याशिवाय दुसरा पर्याय दिसत नाही. पण तसा पर्याय जेव्हा सापडेल तेव्हा ते काम करण्याची आशा न सोडता देणगी देत आहे.

कळावे,

आपली,

सुधा गोवारीकर,
फ्लॅट क्र० 101, बिल्डिंग I वनराजी हाईट, रामबाग कॉलनी, कोथरूड,
पुणे 411 038. स्थिरभाष : 2542 3244.





अनुक्रमणिका

# भाषाविषयक लेखनसूची : २०१३

- नीलिमा गुंडी

[टीप : ही सूची परिपूर्ण नाही. वाचकांनी आपल्या वाचनात आलेले संदर्भ कळवून ही सूची परिपूर्ण करण्यास हातभार लावावा, अशी विनंती आहे.

संपादक ]

१. पुस्तके

(१) (कोशकार) डॉ० कुमार योगेंद्र, डॉ० भट अनघा, डॉ० महाजन सुनंदा/ मराठी रशियन जर्मन शब्दकोश/ कलासक्त, पुणे/ पृ० ५४५/ ₹ ६००
(२) गोरे दादा/ आधुनिक भाषाविज्ञान आणि मराठी भाषा/ गोदा प्रकाशन, औरंगाबाद/ ₹ २५०
(३) (संपादक) जाखडे अरुण/ भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण-महाराष्ट्र/ पद्मगंधा प्रकाशन, पुणे/ पृ० ७१९/ ₹ १,२००
(४) (संपादक) जोशी श्रीकांत धुंडिराज/ मराठी शब्दवैभव/ स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे/ पृ० १३६/ ₹ १३०
(५) डॉ० देव सदाशिव/ ज्ञानभाषा मराठी/ पद्मगंधा प्रकाशन/ पुणे/ पृ० २९५/ ₹ ३००
(६) देशपांडे शरद मुरलीधर/ शब्दार्थ : एका कॉपीरायटरचा प्रवास/ मेनका प्रकाशन, पुणे/ पृ० ३६९/ ₹ १,०००
(७) नूलकर संदीप/ शब्दाशब्दात/ सकाळ प्रकाशन, पुणे/ पृ० १६८/ ₹ १६०
(८) मोकाशी मधुकर/ व्यावहारिक व व्यावसायिक लेखनप्रणाली/ स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे/ पृ० १३६/ ₹ १३०
(९) डॉ० पाटील किसन/ नव्या गद्यशैलीची नोंद/ प्रशांत प्रकाशन, जळगाव/ ₹ १९५
(१०) डॉ० रानडे ज० के०, (संपा० खांडगे मंदा)/ वारली बोली व वारली लोकगीते/ प्रतिमा प्रकाशन, पुणे/ पृ० १६०/ ₹ १७५
(११) वाघे सुरेश पांडुरंग/ संकल्पना कोश खंड १ ते ५/ ग्रंथाली प्रकाशन, मुंबई/ पृ० ३,०००/ ₹ २,५००

(१२) सहस्रबुद्धे चंद्रकांत/ शब्दवेध/ मेहता प्रकाशन, पुणे/ पृ० ९२/ ₹ १००

(१३) -----/ मराठी भाषेची अ-श्वेतपत्रिका/ मराठी अभ्यास केंद्र, ठाणे/ पृ० २५८/- ₹ ३००

(१४) ----------/ शिक्षणाचे मराठी माध्यम : अनुभव आणि अस्वस्थ वर्तमान/ मराठी अभ्यास केंद्र, ठाणे/ पृ० १३८/ ₹ १५०

## २. नियतकालिकांतील लेख

( १ ) करमरकर वैशाली/ भाषास्त्राचा गजरा/ लोकसत्ता, लोकरंग पुरवणी/ ९ जून २०१३/पृ० ७

( २ ) काळे भानू/ मराठीपणाच्या कक्षा वाढवायची गरज (संपादकीय)/ अंतर्नाद/ जुलै २०१३/ पृ० ५

( ३ ) गावित पुष्पा/ महाराष्ट्रातील आदिवासी बोलीभाषा/ महाराष्ट्र साहित्य पत्रिका/ ऑक्टोबर-डिसेंबर २०१३/ पृ० ४०-४८

( ४ ) गोखले मुकुंद/ मुद्राक्षरकला/ ललित सप्टेंबर-२०१३/ पृ० ८१-९०

( ५ ) गुंडी नीलिमा/ चिकित्सक भाषाभ्यासक : सत्त्वशीला सामंत/ ललित/ ऑगस्ट २०१३/ पृ० १७८-१८०

( ६ ) गुंडी नीलिमा/ बहर बोलींचा/ महाराष्ट्र टाइम्स/ १ डिसेंबर २०१३/ पृ० १४

( ७ ) गुंडी नीलिमा/ मराठी व्याकरणाच्या महाभारताचे कर्ते/ सकाळ, सप्तरंग पुरवणी/ ५ मे २०१३/ पृ० ११

( ८ ) जाखडे अरुण/ भाषा सर्वेक्षणानुभव/ लोकसत्ता, लोकरंग पुरवणी/ १८ ऑगस्ट २०१३/ पृ० १ व ७

( ९ ) टिकेकर अरुण/ विरामचिन्हांची भाषा/ लोकमत, मंथन पुरवणी/ २ जून २०१३/ पृ० ७

(१०) तलगेरी प्रमोद/ वैविध्यापेक्षा भाषाविकास महत्त्वाचा/ सकाळ/ २८ ऑगस्ट २०१३/ पृ० ६

(११) तिडके श्रीकांत/ मी मराठी?/ लोकमत, मंथन पुरवणी/ २ जून २०१३/ पृ० २ व ६

(१२) दीक्षित वि०वि०/ सिंधी व मराठी ह्या भाषांची तुलना/ महाराष्ट्र साहित्य पत्रिका/ जुलै-सप्टेंबर २०१३/ पृ० १०२-१०९

(१३) देवरे सुधीर/ भारतीय भाषांचा दस्तावेज/ महाराष्ट्र टाइम्स, ३० जून २०१३/ पृ० ३

(१४) देवी गणेश/ भाषा नष्ट करण्याचा अधिकार आपणाला नाही/ लोकसत्ता, २२ सप्टेंबर २०१३/ पृ० ७
(१५) देवी गणेश (मुलाखतकार : कुळे मुकुंद)/ भाषावैविध्य हे भारताचं मोठंच भांडवल/ महाराष्ट्र टाइम्स/ ११ ऑगस्ट २०१३/ पृ० ६
(१६) धडफळे मो०गो०/ मराठी संस्कृतइतकीच प्राचीन?/ नवभारत, ऑक्टोबर २०१३/ पृ० ३-५
(१७) परब प्रकाश/ भारतीय भाषांची समृद्ध अडगळ/ लोकसत्ता/ २ नोव्हेंबर २०१३/ पृ० ६
(१८) फडके अरुण/ यांत्रिक भाषांतराची (अ)शक्यता/ लोकसत्ता २ नोव्हेंबर २०१३/ पृ० ६
(१९) मोरे लक्ष्मण/ प्रकाशाच्या प्रतीक्षेत ज्ञानभांडार / लोकमत, मंथन पुरवणी/ २२ डिसेंबर २०१३/ पृ० १९
(२०) राजे सुधाकर/ मराठीला 'क्लासिकल' भाषेचा दर्जा/ साप्ताहिक विवेक, १९ ऑगस्ट २०१३/ पृ० १ ते ८)
(२१) शिकारपूर दीपक/ ई वाचाल तर वाचाल/ लोकमत, मंथन पुरवणी, २ जून २०१३/ पृ० २२
(२२) संगमनेरकर अरविंद/ डॉक्टर-पेशंट संवादाची मराठी बोली/ महाराष्ट्र साहित्य पत्रिका/ ऑक्टोबर-डिसेंबर २०१३/पृ० ४९-५२
(२३) --------(संपादकीय)/ म मखरातील नि मनातील/ सकाळ, २५ मे २०१३/ पृ० ६
(२४) --------(संपादकीय)/ इंग्लिश विंग्लिश/ महाराष्ट्र टाइम्स, १४ डिसेंबर २०१३/ पृ० १०

**३. नियतकालिकांतील भाषाविषयक सदरे**

( १ ) गुंडी नीलिमा/ भिंग भाषेचे/ मिळून साऱ्याजणी (मासिक), ऑगस्ट २०१३ पासून सुरू.
( २ ) नूलकर संदीप/ शब्दाशब्दात/ सकाळ साप्ताहिक
( ३ ) परब प्रकाश/ भाषाबोध/ पुढारी/ रविवार पुरवणी
( ४ ) सामंत सत्त्वशीला/ शब्दरंग/ साप्ताहिक लोकप्रभा
( ५ ) (विविध व्यक्तींचे बोलीविषयक लेख)/ मायबोली/ लोकसत्ता / लोकरंग (रविवार) पुरवणी

४. विशेषांक

(मराठी भाषा विशेषांक)

( १ ) अक्षरगाथा - संपादक : डॉ० मा०मा० जाधव, वर्ष ४, अंक ३/ बळीवंश प्रकाशन, नांदेड/ ऑक्टोबर २०१३

■

**मुखपृष्ठाविषयी :**

■ **संदर्भ** : 'बळी' विभावरी शिरूरकर, देशमुख आणि कंपनी, पुणे १९५०, पृ० ७०.

**भूमिका** : स्वातंत्र्योत्तर कालखंडातील निवडक कादंबऱ्यांमधील भाषेचे दर्शन घडवणे, हे या वर्षीच्या 'भाषा आणि जीवन'च्या मुखपृष्ठांच्या मागील सूत्र आहे.

विभावरी शिरूरकर (ऊर्फ मालतीबाई बेडेकर) यांनी 'बळी' या कादंबरीत सामाजिक वास्तवातील गुंतागुंतीचे चित्रण प्रभावीपणे केले आहे. या कादंबरीतील आबा हा नायक मांगगारुडी या विमुक्त जमातीतील आहे. या कादंबरीत स्वातंत्र्यपूर्व, तसेच स्वातंत्र्योत्तर कालखंडामधील तळागाळातील समाजघटकांच्या प्रश्नांविषयीचे भान आढळते. मुखपृष्ठावर उद्धृत केलेला उतारा म्हणजे आबाने न्यायाधीशांसमोर व्यक्त केलेले मनोगत आहे. आबाच्या मनात शिक्षणामुळे रुजलेले परिवर्तनाचे विचार आणि नव्याने जागृत झालेले त्याचे आत्मभान या दोहोंची अभिव्यक्ती मनोगतातील शब्दाशब्दातून जोरकसपणे झाली आहे. मनोगतातील हे शब्द त्याच्या व्यक्तिगत भावजीवनाचे दर्शन घडवतानाच परिवर्तनाच्या वाटेवरील अनेकांच्या संघर्षमय जगण्याचे प्रातिनिधिक स्वरूपात दर्शनही घडवतात.

**नीलिमा गुंडी**

## वर्गणीदारांसाठी सूचना

'भाषा आणि जीवन'ची वर्गणी ई-बँकिंग सुविधा वापरूनदेखील पाठविता येईल. इच्छुक वर्गणीदारांनी बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रस्ता शाखा, पुणे येथील मराठी अभ्यास परिषदेच्या बचत खाते क्र० 20057164260 ह्या खात्यावर वर्गणीची रक्कम जमा करावी व व्यवहार पूर्ण केल्यानंतर परिषदेकडे पत्राद्वारे वा ई-टपालाने व्यवस्थापकांच्या पत्त्यावर शक्य तितक्या लवकर वर्गणीदाराचे संपूर्ण नाव, टपाल-पत्ता, स्थिरभाष क्रमांक, चलभाष क्रमांक, वर्गणी कोणत्या अंकापासून घेतली जावी त्याबाबत व भरणा केलेल्या रकमेचे तपशील कळवावेत.

